# महाराष्ट्र विधानपरिषद

## पहिले (अर्थसंकल्प) अधिवेशन, २०१९

---

## अतारांकित प्रश्नोत्तरांची यादी

**प्रश्नांची एकूण संख्या - ५०**

---

### भूकंप पुनवर्सन प्रकल्पातील कंत्राटी कनिष्ठ अभियंत्यांना सेवा निवृत्ती विषयक लाभाशिवाय सेवा जेष्ठता व इतर अनुषंगिक लाभाबाबत

**(१) २६५ (२३-०१-२०१५). श्री.सतिश चव्हाण :** सन्माननीय **भूकंप पुनर्वसन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात भूकंप पुनर्वसन प्रकल्पातील कंत्राटी कनिष्ठ अभियंत्यांना सेवानिवृत्ती विषयक लाभाशिवाय सेवा जेष्ठता व इतर अनुषंगिक लाभ घेण्यासाठी शासन विचाराधीन आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी सहानुभूतीपूर्वक विचार करून शासन निर्णय घेणार आहे काय,

(३) असल्यास, त्याचे स्वरुप काय,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (३०-११-२०१८) :** (१) नाही.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पुसद तालुक्यातील माळपठार भागातील विजेचे भारनियमन कमी करण्याबाबत

**(२) ३३४ (२३-०१-२०१५). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुसद तालुक्यातील माळपठार भागातील इरापूर धरणाच्या जवळील शेतकऱ्यांनी प्रत्येकी ५ लक्ष रुपये खर्च करुन शेतापर्यंत पाईपलाईन टाकली परंतु भारनियमामुळे शेतकऱ्यांना शेतीसाठी पाणी उपलब्ध होत नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शेतकऱ्यांचे नुकसान होत असताना भारनियमन कमी करुन शेतकऱ्यांना पुरेश्या प्रमाणात पाणी मिळण्यासाठी शासनाने चौकशी करुन कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (२२-०१-२०१९) :** (१) खरे नाही, शासन निर्णय व वीज नियामक आयोगाच्या नियमानुसार पुसद तालुक्यासहीत संपूर्ण महाराष्ट्रात कृषीपंपाना दिवसा ८ तास व रात्री १० तास चक्राकार पध्दतीने विजेची उपलब्धता देण्यात येत आहे. तसेच इतर वाहिन्यांवर वितरण व वाणिज्य हानीच्या गटानुसार संपूर्ण महाराष्ट्रात भारनियमनाच्य परिपत्रकानुसार भारनियमन करण्यात येते.

(२) प्रश्न उद्‌भवत नाही.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## कारंजा तालुक्यातील (जि.वाशिम) महागाव, लोहगाव, कासारखेड, मोरळ, गावठाण गावांना स्वतंत्र वीज पुरवठा करण्याबाबत

**(३) १९३६ (२३-०१-२०१५). श्री.हरिसिंग राठोड, प्रा.जोगेन्द्र कवाडे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कारंजा तालुक्यातील (जि.वाशिम) महागाव, लोहगाव, कासारखेड, मोरळ, गावठाण फिडर जोडले नसून या गावांना वीज पुरवठा अे.जी. (पंप) फिडर वरुन केल्या जात असल्यामुळे गावातील जनतेला भारनियमनचा त्रास सहन करावा लागत असल्याचे माहे नोव्हेंबर, २०१४ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय
(२) असल्यास, आजपर्यंत या गावात स्वतंत्र वीज पुरवठा करण्याबाबत शासनाने काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (२२-०१-२०१९) :** (१) होय. सं.व.सु. विभाग वाशिम अंतर्गत कारंजा उपविभागामधील महागांव व लोहगांव बार्शीटाकळी उपविभागामधील अंतर्गत कासारखेड, मोरळ या गावांचा वीज पुरवठा ३३ के.व्ही. उपकेंद्र काकडशिवणी येथुन निघणाऱ्या ११ के.व्ही. काजळेश्वर फिडर वरुन करण्यात येतो. सद्य:स्थितीत सदर गावांना कृषी पंप (Ag Feeder) प्रमाणे भारनियमन करण्यात येत आहे.
(२) कारंजा उपविभागातील महागांव व लोहगांव ही गाव गावठाण फिडर-२ योजनेंतर्गत समाविष्ट करण्यात आलेली होती. सदर कामाचे कंत्राट दिले होते. परंतु कंत्राटाच्या रकमेची तरतूद संपल्यामुळे पुढील काम करता आले नाही. सद्य:स्थितीत गावठाण विलगीकरणाकरीता दिन दयाल उपाध्याय ग्राम ज्योती योजनेंतर्गत सदरहू गावांचा समावेश करण्यात आला आहे.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील विलेपार्ले (प) येथील पवनहंस पासून ते अंबोली नाक्यापर्यंत उड्डाणपूल बांधण्याबाबत

**(४) १२९३९ (०२-०५-२०११). डॉ.सुधीर तांबे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) अंधेरी (मुंबई) पश्चिमेस असलेल्या एस.व्ही. रोडवर मोठ्या प्रमाणात वाढत असलेल्या वाहतुकीची कोंडी सोडविण्यासाठी एस.व्ही. रोड पवनहंस

हेलिपॅड पासून ते अंबोली नाक्यापर्यंत भायखळ्याप्रमाणे एक उड्डाणपूल बांधण्याठी मा.स्थानिक लोकप्रतिनिधी यांनी संबंधितांकडे वारंवार मागणी करुनही अद्याप याबाबत कोणीच कार्यवाही झाली नसल्याचे माहे जानेवारी, २०११ मध्ये वा त्यादरम्यान आढळून आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू ठिकाणी भायखळ्याप्रमाणेच उड्डाणपूल बांधण्याबाबत तसेच उड्डाणपुलाची वारंवार होत असलेल्या मागणीकडे दुर्लक्ष करणाऱ्या संबंधित अधिकारी यांचेवर कारवाई करण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (११-१२-२०१८) :** (१) व (२) बृहन्मुंबई महानगरपालिकेकड उपलब्ध असलेल्या अभिलेखानुसार सदर उड्डाणपुलाबाबतची कागदपत्रे आढळून आली नाहीत.

तथापि, सदर उड्डाणपुलासंबंधी महानगरपालिकेमार्फत स्थळपाहणी करण्यात आली असून, सदर उड्डाणपुलाच्या आरंभस्थानी मेट्रो मार्ग प्रस्तावित आहे. तसेच एस.व्ही. रोड व बर्फीवाला मार्ग जंक्शन येथील उड्डाणपुल व एस.व्ही. रोड जयप्रकाश मार्ग जंक्शन येथील मेट्रो मार्ग कार्यान्वित झाला असल्यामुळे सदर उड्डाणपुलाचे बांधकाम करणे तांत्रिकदृष्ट्या शक्या होत नसल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नाशिक व औरंगाबादसह अनेक शहराचे विकास आराखडे प्रदिर्घ काळापासून शासनाच्या मंजूरीच्या प्रतिक्षेत असल्याबाबत

**(५) २७८३७ (२४-०४-२०१२). श्री.अनिल भोसले, श्री.हेमंत टकले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नाशिक औरंगाबादसह अनेक शहराचे विकास आराखडे प्रदिर्घ काळापासून शासनाच्या मंजूरीच्या प्रतिक्षेत असल्याचे माहे डिसेंबर, २०११ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, शहर विकास आराखडे मंजूर नसल्यामुळे अनेक शहरांमध्ये मनमानीपणे विकास योजना राबविल्या जात आहेत, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, प्रदिर्घ काळापासून प्रलंबित असलेले विकास आराखडे मंजूरीबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२०-१२-२०१८) :** (१) सन २०११ पासून नाशिकसह अनेक शहरांच्या विकास आराखड्यांना शासनाने मंजूरी दिलेली आहे.
(२) हे खरे नाही.
(३) महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६ मध्ये सुधारणा अंमलात आणलेल्या असून नियोजन प्राधिकरणाकडून विकास आराखडे शासनास मंजूरीसाठी सादर झालेनंतर शासनाने मंजूर करणेसाठी कालमर्यादा निश्चित केलेली आहे. सदर तरतुदीप्रमाणे विकास आराखडे विहित कालमर्यादेत मंजूर करणेची कार्यवाही केली जात आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मुंबईसह राज्यात परवडणारी घरे बांधण्याकरीता शासनाने प्रस्तावित केलेले भूखंड वितरीत करण्यात आल्याबाबत

**(६) २८१३४ (१४-०४-२०१७). श्री.सुजितसिंह ठाकूर, श्री.धनंजय मुंडे, ॲड.निरंजन डावखरे :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईसह राज्यात सन २०२२ पर्यंत ११ लाख परवडणारी घरे बांधण्याकरीता शासनाने प्रस्तावित केलेले भूखंड हे अगोदर वितरीत करण्यात आल्याचा प्रकार दिनांक १९ जानेवारी, २०१७ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आला, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, प्रस्तावित केलेले भूखंड प्रत्यक्षात ताब्यात नसल्याने कोकण गृहनिर्माण मंडळाने जारी केलेली ३,६१२ कोटी रुपयांची निविदा म्हाडाने रद्द केली, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर प्रकरणाची शासनाने चौकशी केली आहे काय, यामध्ये आधीच वितरीत केलेले भूखंड परवडणारी घरे बांधण्याकरीता उपलब्ध

असल्याचे कागदोपत्री दाखवणाऱ्या संबंधित अधिकारी-कर्मचारी यांचेविरूध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (२८-०९-२०१८) :** (१), (२) व (३) प्रधानमंत्री आवास योजनेबाबत कोकण मंडळामार्फत सादर केलेल्या एकूण १५ गृहनिर्माण प्रस्तावापैकी १४ प्रस्तावांना केंद्रीय मान्यता व सनियंत्रण समितीने काही अटीवर मान्यता दिली होती. या १४ पैकी ११ जमिनींवरील आरक्षण बदलास नगरविकास विभागाने तत्वत: मान्यता दिली होती. या ११ जमिनी म्हाडास लवकरच हस्तांतरीत होतील या गृहितकावर सदरहू जमिनीची आगाऊ मोजणी संचालक, भूमी अभिलेख यांच्या मान्यतेने हाती घेण्यात आली.

सदरहू ११ ठिकाणचे गृहनिर्माण प्रकल्प हाती घेण्याकरीता दिनांक २४/१०/२०१६ रोजी म्हाडाच्या संकेतस्थळावर निविदा प्रसिध्द करण्यात आल्या. सदर निविदेस आक्षेप नोंदविल्यामुळे दिनांक २९/१०/२०१६ रोजी सदर निविदांना स्थगिती देण्यात आली. या प्रकरणी शासनाने उपस्थित केलेल्या मुद्यांच्या अनुषंगाने म्हाडाने सादर केलेल्या अहवालानंतर निविदेस दिलेली स्थगिती दिनांक ०३/०१/२०१७ रोजी उठविण्यात आली.

उपरोक्त ११ जमिनींपैकी ९ जमिनींवरील आरक्षण बदलाची सूचना नगरविकास विभागाकडून अधिसूचित करण्यात आली. बोळींज येथील २ जमिनींच्या आरक्षण बदलाची सूचना अद्यापपर्यंत अधिसूचित करण्यात आलेली नाही. निळजे येथील जमिनीसाठी एमएमआरडीए ची मागणी असल्यामुळे तसेच वावे व केळवली या २ जमिनींबाबत राज्यस्तरीय मान्यता व सनियंत्रण समितीकडून Ratification न मिळाल्यामुळे या ५ जमिनी वगळून उर्वरित ६ जमिनीच्या सुधारित निविदा दिनांक ०८/०१/२०१७ रोजी प्रसिध्द करण्यात आल्या.

शासनाच्या निदेशानुसार जिल्हाधिकारी ठाणे यांनी त्यांच्या दिनांक ११/०१/२०१७ रोजीच्या आदेशान्वये भंडार्ली, गोठेघर, खोणी, शिरढोण व बारावे येथील जमिनीचा म्हाडास आगाऊ ताबा दिलेला आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## संत सेवालाल महाराज यांचे जयंती निमित्त राज्यात सुट्टी जाहीर करण्याबाबत

**(७) २८२६१ (१४-०४-२०१७). श्री.हरिसिंग राठोड : तारांकित प्रश्न क्रमांक १६६८३ ला दिनांक २३ मार्च, २०१६ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) संपूर्ण बंजारा समाजाचे आराध्यदैवत संत सेवालाल महाराज यांची जयंती राज्यात १४ फेब्रुवारी रोजी साजरी केली जाते राज्यातील बंजारा समाजाच्या सामाजिक संघटनाचे या दिवशी सार्वजनिक सुट्टी जाहीर करा अशा आशयाचे निवेदन प्राप्त झाले आहे काय,

(२) असल्यास, शेजारील आंध्रप्रदेश व कर्नाटक या राज्यात संत सेवालाल महाराज यांच्या जयंती निमित्त सुट्टी असूनही महाराष्ट्रात सुट्टी जाहीर न करण्याची कारणे काय आहेत,

(३) या बाबतीत शासनाचे धोरण काय आहे ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०८-०५-२०१७) :** (१) होय.

(२) व (३) शासनाचे शासकीय सुट्टया देण्याबाबतचे सर्वसाधारण धोरण विचारात घेता सद्य:स्थितीत ज्या सण/प्रसंगानिमित्त सार्वजनिक सुट्टया जाहीर केल्या त्याव्यतिरिक्त अन्य सण/प्रसंगानिमित्त सुट्टी देणे किंवा त्यामध्ये बदल करणे प्रशासकीयदृष्टया व्यवहार्य नाही. त्यामुळे संत सेवालाल महाराज यांच्याबद्दल शासनास अत्यंत आदर असून देखील त्यांचे जयंतीनिमित्त सार्वजनिक सुट्टी देता येणे शक्य नाही.

---

## माजी मुख्यमंत्री स्व.वसंतराव नाईक यांचे जन्मशताब्दी वर्षातील कामे पूर्ण करण्याबाबत

**(८) ३०९०२ (११-०८-२०१७). श्री.हरिसिंग राठोड : दिनांक २० जुलै, २०१६ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ५ मधील प्रश्न क्रमांक ३३१८ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) माजी मुख्यमंत्री स्व.वसंतराव नाईक यांनी राज्यात विविध कल्याणकारी योजना राबविल्या त्यांचे योगदान पाहता शासनाने दिनांक १ जुलै, २०१२ ते दिनांक ३० जून, २०१३ हे वर्ष जन्मशताब्दी वर्ष म्हणून साजरा करण्याचे ठरविले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त जन्मशताब्दी वर्ष साजरे करण्यासाठी सन २०१३-१४ मध्ये १०० कोटी रुपये मंजूर करण्यात आले होते, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त जन्मशताब्दी वर्षासंदर्भात सामान्य प्रशासन विभागाने दिनांक २ नोव्हेंबर, २०१२ अन्वये योजना आणि कामे प्रस्तावित केले असताना यामधील बरीचशी कामे अपूर्णच असल्याचेही निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, उक्त जन्मशताब्दी वर्षानिमित्त प्रस्तावित केलेल्या संपूर्ण कामाचा फेर आढावा शासन घेणार आहे काय व प्रलंबित राहिलेल्या बाबी पूर्ण करण्यात येणार आहेत काय,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०८-०१-२०१९) :** (१) व (२) होय.

(३), (४) व (५) दिनांक ०२/११/२०१२ च्या शासन निर्णयान्वये स्व.वसंतराव नाईक यांच्या जन्मशताब्दी वर्षात प्रस्तावित कार्यक्रमाची रुपरेषा ठरविण्यासाठी मा.मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली समितीची स्थापना करण्यात आली होती. समितीने अंतिम केलेल्या आर्थिक बाबींशी निगडीत एकूण १५ कामांपैकी ८ कामे पूर्ण झाली आहेत. बांधकामाशी निगडीत उर्वरित कामांचा शासनस्तरावर आढावा घेण्यात येत आहे.

---

## कल्याण शहरातील अंमलीपदार्थांची विक्री रोखण्याबाबत

**(९) ३१३६२ (११-०८-२०१७). श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.धनंजय मुंडे, श्रीमती विद्या चव्हाण :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कल्याण शहराच्या पत्रीपुलाजवळील वस्तीतील एका घरात अंमलीपदार्थांची विक्री होत असल्याची माहिती डोंबिवलीतील दुर्गेश चव्हाण, विशाल पवार आणि वैभव राणे या सामाजिक कार्यकर्त्यांना मिळाल्यावर त्यांनी सदरहू ठिकाणी शनिवार दिनांक ३ जून च्या मध्यरात्री जाऊन आरोपी पकडण्याचा प्रयत्न केला होता, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, त्यांच्या या धाडसी कृत्याची माहिती आरोपीला होताच त्याने पळ काढला मात्र, त्याठिकाणी अंमलीपदार्थ घेण्यासाठी आलेल्या महाविद्यालयीन विद्यार्थ्याला पकडून त्यांनी पोलिसांच्या ताब्यात दिले होते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, नागरिकांच्या वर्दळीने गजबजलेल्या कल्याण स्थानकापासून जवळच्या अंतरावरील या अंमली पदार्थांचे ठिकाण चालविणारा व पळून गेलेल्या आरोपीचा शोध घेण्यासाठी पोलिसांनी कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) असल्यास, सदरहू अंमलीपदार्थ विकणाऱ्या हस्तकांकडून या तीन तरुण सामाजिक कार्यकर्त्यांना जीवे मारण्याच्या धमक्या दिल्या जात असताना या कार्यकर्त्यांच्या रक्षणासाठी शासनाने व स्थानिक पोलिसांनी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-१२-२०१८) :** (१), (२) व (३) दिनांक ३/०६/२०१७ रोजी अभिजित अनिल गावडे, वय १८ हा रात्री २०.३० वा. चे सुमारास जोशी हायस्कुल रस्त्याचे लगत सिगारेट मध्ये गर्द पित असताना त्याचे सोबत साहील विचारे, दर्शन करमरकर, प्रणव विचारे असे होते. त्यावेळी श्री.वैभव विलास राणे वय २३, रा. खंबाळपाडा व इतर यांनी त्यांना पकडले व त्यांना डोंबिवली पोलीस ठाणे येथे घेवुन गेले. त्यांनी ज्यांचे कडून गर्द विकत घेतले त्यांचा कचोरेगाव, पत्रीपुल येथे शोध घेण्यात आला.

तथापि, सदर ठिकाणी काहीएक अक्षेपार्ह मिळुन आले नाही.

(४) श्री वैभव राणे यांना एक सशस्त्र पोलीस अंमलदार संरक्षणाकरीता द्यावा असा सपोआ डोंबिवली विभाग, डोंबिवली श्री.वाडेकर यांनी तोंडी आदेश केल्याने त्यांना दिनांक ११/०६/२०१७ पासून ०१ सशस्त्र पोलीस अंमलदार दिवसा संरक्षणार्थ नेमलेला होता.
(५) विलंब झालेला नाही.

---

## रेरा अधिनियमांतर्गत बांधकाम व्यावसायिकांनी प्रकल्पांची नोंदणी करणेबाबत

**(१०) ३२६६९ (११-०८-२०१७). प्रा.जोगेन्द्र कवाडे, डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) बांधकाम व्यवसायात पारदर्शकता आणण्यासाठी राज्य शासनाने सुरु केलेल्या रियल इस्टेट रेग्युलेटरी ॲथॉरिटी (रेरा) कडे बांधकाम व्यावसायिकांनी महिनाभरात फक्त १२ प्रकल्प व ९०० एजंट नोंदणीकृत झाले असल्याची बाब माहे जून, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, अन्य बांधकाम व्यावसायिकांनी आपल्या प्रकल्पांची रेरा अधिनियमांतर्गत नोंदणी न करण्यामागील कारणे काय आहेत,
(३) असल्यास, उक्त बांधकाम व्यावसायिक कधीपर्यंत आपल्या प्रकल्पांची नोंदणी रेरा अधिनियमांतर्गत नोंदणी करणे अपेक्षित आहे,
(४) असल्यास, जे बांधकाम व्यावसायिक नोंदणी करणार नाहीत त्यांच्याविरुध्द शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (२०-१२-२०१८) :** (१) हे खरे नाही.
(२) प्रश्न उद्भवत नाही.
(३) जसे जसे नवीन प्रकल्प येतील तसे तसे सदर प्रकल्पांना नोंदणी करणे आवश्यक असेल. प्रकल्प नोंदणीची प्रक्रिया ही एक नियमितची प्रक्रिया आहे.

(४) स्थावर संपदा (विनियमन व विकास) अधिनियम, २०१६ मधील कलम ५९ मधील तरतुदींनुसार नोंदणी न केलेल्या प्रकल्पांविरुध्द कारवाईची तरतूद आहे. त्यानुसार कारवाई करण्यात येते.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कल्याण-डोंबिवली महानगरपालिका क्षेत्रातील अनधिकृत बांधकामाबाबत

**(११) ३३५०८ (११-०८-२०१७). ॲड.अनिल परब :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कल्याण-डोंबिवली महानगरपालिका क्षेत्रातील अनधिकृत बांधकामाबाबत नियुक्त अग्यार समितीचा अहवाल नगरविकास विभागाकडे सन २००९ मध्ये सादर करण्यात आला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदरहू अहवाल शासनास प्राप्त झाला आहे काय, सदरहू अहवालाचे स्वरुप काय आहे व उक्त अहवाल तयार करण्याकरीता किती खर्च करण्यात आला आहे,
(३) असल्यास, सदरहू अहवाल सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आला आहे काय,
(४) असल्यास, उक्त अहवालात दोषी आढळून आलेल्या व्यक्तीवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०३-१२-२०१८) :** (१) होय.
(२) सदर अहवाल दिनांक २४/८/२००९ च्या पत्राने शासनास प्राप्त झाला होता.परंतु मंत्रालयात दिनांक २१/६/२०१२ रोजी लागलेल्या आकस्मिक आगीमध्ये सदर अहवाल नष्ट झाल्याने परत सदर अहवालाची प्रत मागविण्यात आली असता ती दिनांक ३०/५/२०१५ च्या पत्राने शासनास प्राप्त झाली आहे.

सदर अहवालात कल्याण-डोंबिवली महानगरपालिका क्षेत्रातील अनधिकृत बांधकामासाठी जबाबदार असणाऱ्या संबंधित व्यक्ति/अधिकारी यांची नांवे नमुद केली आहेत.

(३) मा.अग्यार समिती मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार गठीत केली असल्याने सदर अहवाल सभागृहाचे पटलावर ठेवण्यात आला नाही.
(४) समितीने सदर अहवालात सुचविल्यानुसार अनधिकृत बांधकामाबाबत जबाबदार संबंधित बिल्डर्स/ डेव्हलपर्स/ कॉन्ट्रॅक्टर्स/ स्लम लॉर्डस/ आर्किटेक्ट/ इंजिनिअर्स यांना नोटीस देऊन पुढील आवश्यक कार्यवाही करण्याबाबत आयुक्त, कल्याण-डोंबिवली महानगरपालिका यांना कळविण्यात आले आहे.

तसेच, कल्याण-डोंबिवली महानगरपालिकेच्या आस्थापनांवरील संबंधित अधिकारी/नगरसेवक, नगर रचना विभागातील संबंधित अधिकारी, आयुक्त/प्रशासक/जिल्हाधिकारी/वन अधिकारी यांचे बाबतीत नियमानुसार कारवाई करणेस शासनाच्या संबंधित विभागास कळविण्यात आले आहे.
(५) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## महाराष्ट्रात घुसखोरी केलेल्या रोहिंग्यांनी महिला पोलिसांवर अत्याचार केल्याबाबत

**(१२) ३४७७१ (०४-०१-२०१८). श्री.धनंजय मुंडे, श्री.हेमंत टकले, श्री.किरण पावसकर, ॲड.निरंजन डावखरे, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील आझाद मैदान येथे दिनांक ११ ऑगस्ट, २०१२ रोजी वा त्यासुमारास रझा अकादमीने काढलेल्या पूर्वनियोजित मोर्चामध्ये देशात व महाराष्ट्रात घुसखोरी केलेल्या रोहिंग्यांनी महिला पोलिसांवर अत्याचार करुन अमर जवान स्मारकाची तोडफोड करणाऱ्यांवर कारवाई किंवा मालमत्तेची नुकसान भरपाई केली नसल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, राज्याच्या विविध भागात म्यानमार व बांग्लादेशातून रोहिंग्या अतिरेक्यांची घुसखोरी होत असल्याने राज्य शासनाने विषयाचे गांभीर्य जाणून कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२७-१२-२०१८) :** (१) दिनांक ११/८/२०१२ रोजी आझाद मैदान येथील निदर्शनादरम्यान झालेल्या दंगलीत हिंसक जमावाने पोलिसांची वाहने, प्रसार माध्यमांची वाहने तसेच बेस्टच्या बसेसची मोडतोड करुन जाळपोळ केली आणि इतर सार्वजनिक मालमत्तेचे नुकसान केले. या हिंसक जमावाने जमावबंदीच्या आदेशाचे उल्लंघन करुन सरकारी कामात अडथळा केला तसेच कर्तव्यावरील पोलिसांवर हल्ला केला व त्यांना जीवे मारण्याचा प्रयत्न केला, कर्तव्यावरील महिला पोलीस अमंलदारांचा विनयभंग केला, पोलिसांच्या हातामधील अग्निशत्रे खेचून घेतली म्हणून आझाद मैदान पोलीस ठाणे येथे गु.नो.क्र. १३३/२०१२, कलम १०९, ११७, १४३, १४४, १४५, १४७, १४९, १५१, १५२, १५३, ३३२, ३३३, ३४१, ३५३, ४३५, ३०७, ३२४, ३२६, ३०२, ३५४, ३९५, ४३१, ४४०, ५०५(१)(२), १२०(ब) भादंवि सह कलम ३,४,२५,२७ भारतीय हत्यार कायदा सह कलम-३,४ सार्वजनिक मालमत्तेला नुकसान करण्यास प्रतिबंधतेचा कायदा सह कलम ३७(अ)(१), १३५ मुंबई पोलीस कायद सह कलम ७, क्रिमिनल अमेंडमेंट ॲक्ट, अन्वये दिनांक ११/८/२०१२ रोजी गुन्हा नोंदविण्यात आला असून सदर गुन्हयाचा पुढील तपास गुन्हे शाखेकडे वर्ग करण्यात आला. गुन्हे शाखेने गुन्हा नोंद क्र. ८१/२०१२ अन्वये नोंदवून गुन्हे प्रकटीकरण शाखा, कक्ष-१, मुंबई यांनी पुढील तपास केला.

दंगलीत सुमारे ४००० आरोपींचा गुन्हयात सहभाग असल्याचे तपासातून निष्पन्न झाले. अद्यापपर्यंत अटक करण्यात आलेल्या ६४ आरोपींपैकी ५९ आरोपींविरुध्द दोषारोपपत्र सादर करण्यात आले आहे पाच आरोपींना मुक्त करण्यात आले आहे. सदर खटला मा.सत्र न्यायालयाकडे वर्ग करण्यात आला आहे. मात्र खटल्यामध्ये अद्याप चार्ज फ्रेम झालेला नाही. हिंसक जमावाने सरकारी, खाजगी व सार्वजनिक मालमत्तेचे एकूण २७४ लक्ष रुपयांचे नुकसान केल्याचे तपासात आढळले आहे. सदर मालमत्तेच्या नुकसानीच्या वसूलीकरीता जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांना कळविले आहे.

(२) राज्याच्या विविध भागात म्यानमार व बांग्लादेशातून आलेले रोहिंगे वास्तव्य करणार नाहीत याची दक्षता घेण्याबाबत पोलीस ठाण्यांना सूचना देण्यात आलेल्या आहेत.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

## मुंबईतील घाटकोपर येथील साईसिध्दी इमारत दुर्घटनेबाबत

**(१३) ३५३७२ (०४-०१-२०१८). ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर, श्री.ख्वाजा बेग, श्री.किरण पावसकर, श्री.हेमंत टकले, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.धनंजय मुंडे, ॲड.निरंजन डावखरे, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील घाटकोपर येथे नर्सिंग होम बंद करुन बार सुरु करण्यासाठी तळमजल्यावरील पिलर तोडल्याने साईसिध्दी ही चार मजली इमारत दिनांक २५ जुलै, २०१७ रोजी वा त्यासुमारास कोसळली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, या दुर्घटनेत १७ जण मृत्यू पावले तर १४ जण गंभीर जखमी झाले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त दुर्घटनेची शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार यास जबाबदार असणाऱ्या दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-१२-२०१८) :** (१) व (२) दिनांक २५ जुलै, २०१७ रोजी घाटकोपर येथील साईसिध्दी इमारत कोसळून झालेल्या दुर्घटनेत १७ व्यक्तींचा मृत्यू झाला असून, १३ व्यक्ती व बचावकार्यात मुंबई अग्निशमन दलाचे २ जवान जखमी झाले होते ही वस्तुस्थिती आहे.

तथापि, सदर ठिकाणी नर्सिंग होम बंद करुन तेथे दुसरे नर्सिंग होम सुरु करण्यात येणार होते असे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(३) व (४) सदर प्रकरणी बृहन्मुंबई महानगरपालिकेचे अतिरिक्त आयुक्त (पूर्व उपनगरे), उप आयुक्त (सुधार) व संचालक (अभियांत्रिकी सेवा व प्रकल्प) यांच्या चौकशी समितीमार्फत चौकशी प्रक्रिया पूर्ण करुन त्याबाबतचा अहवाल दिनांक २२/०८/२०१७ रोजी आयुक्त, बृहन्मुंबई महानगरपालिका यांना सादर करण्यात आला आहे.

सदर अहवालातील चौकशी समितीने केलेल्या शिफारशींच्या अनुषंगाने प्रमुख अधिकारी (चौकशी) यांचेमार्फत चौकशी पूर्ण करण्यात आली असून, ५ वैद्यकीय आरोग्य अधिकारी, २ कार्यकारी अभियंता, ५ सहायक अभियंता, ५ दुय्यम अभियंता, १० कनिष्ठ अभियंता, १ विभाग निरीक्षक (करनिर्धारण व संकलन), १ उप अधिक्षक, १ तत्कालीन अधिक्षक व ११ जलमापक पर्यवेक्षक यांचेविरुध्द खात्यांतर्गत संक्षिप्त चौकशी करण्याचे आदेश अतिरिक्त आयुक्त (पूर्व उपनगरे) यांनी दिनांक २८/०५/२०१८ रोजी पारित केले आहेत. त्यानुषंगाने पुढील कार्यवाही सुरु आहे.

---

## राज्यात विविध ठिकाणी बेकायदेशीर गोमांस विक्री होत असल्याबाबत

**(१४) ३५३८८ (०४-०१-२०१८). श्री.सुभाष झांबड :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात गोमांस विक्रीस संपूर्ण बंदी असतानाही विविध ठिकाणी गोमांसाची बेकायदेशीर विक्री होत असल्याचे पोलिसांनी टाकलेल्या छाप्यातून निदर्शनास आले आहे, तसेच गोरक्षकांकडून मोठ्या प्रमाणात हल्ल्यांच्या प्रकारातही वाढ झाली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्य शासनाने प्रत्येक जिल्ह्यामध्ये गोरक्षकांना प्रतिबंध घालण्यासाठी विभागीय सक्षम वरिष्ठ पोलीस अधिकाऱ्यांची नेमणूक करण्याचे आदेश मा.सर्वोच्च न्यायालयाने शासनाला दिल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकार रोखण्यासाठी शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२७-११-२०१८) :** (१) बृहन्मुंबई आयुक्तालयाच्या कार्यक्षेत्रात सन २०१७ मध्ये गोमांसाची विक्री होत असल्याबाबत ३ गुन्हे नोंद करण्यात आले आहेत. तसेच गोमांसाची अवैद्य वाहतूक केल्याबाबत तीन गुन्हे दाखल करण्यात आले आहेत.

बृहन्मुंबई वगळून राज्यात गोमांसाची विक्री करण्याबाबत सन २०१७ मध्ये २८७ गुन्हे व जानेवारी, २०१८ पर्यंत २३ गुन्हें दाखल करण्यात आले आहेत. गोरक्षकांकडून करण्यात आलेल्या हल्याबाबत सन २०१७ मध्ये ३ घटना घडलेल्या आहेत. जानेवारी, २०१८ पर्यंत अशी कोणतीही घटना घडलेली नाही.

(२) होय, हे खरे आहे.

(३) गोरक्षक कटांच्या हिंसाचारास आळा घालण्यासाठी आयुक्त कार्यालयांतर्गत पोलीस उप आयुक्त, विशेष शाखा यांची व जिल्हा पोलीस दलात उप पोलीस अधीक्षक, गृह यांची समन्वये अधिकारी म्हणून नेमणूक करण्याबाबत कळविण्यात आले आहे.

(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मेट्रो वन प्रकल्प उभारताना झालेल्या करारानुसार होमगार्ड प्रशिक्षण केंद्र व प्रशासकीय इमारत बांधण्याबाबत

**(१५) ३५६८५ (०४-०१-२०१८). श्री.रविंद्र फाटक, प्रा.जोगेन्द्र कवाडे : तारांकित प्रश्न क्रमांक ३४२५६ ला दिनांक ९ ऑगस्ट, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मेट्रो वन प्रकल्प उभारताना गृह विभागाची २४ हेक्टर जमीन कास्टिंग यार्डसाठी वापरणाऱ्या रिलायन्सच्या मुंबई मेट्रो वन प्रायवेट लिमिटेडने भाड्यापोटी द्यावयाचे रुपये ३१ कोटी ६८ लक्ष ४५ हजार थकविले असल्याचे माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, होमगार्डची जमीन देतेवेळी झालेल्या करारानुसार होमगार्ड प्रशिक्षण केंद्र व प्रशासकीय इमारत बांधलेली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाचे आर्थिक नुकसान होत असल्याने संबंधित दोषींवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२८-११-२०१८) :** (१) व (२) होय.

(३) व (४) सदर जमिनीच्या भाड्यापोटी रुपये ३१,८९,७२,४२१/- एवढी रक्कम दिनांक ३१ जुलै, २०१७ अखेर भरण्यास मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने मुंबई मेट्रो वन प्रा. लि. कंपनीला कळविले असून सदर रक्कमेपैकी ३,९७,९८,०००/- इतके भाडे देय असलेल्या रकमेमधून मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने वजा/वळते केले आहे.

तथापि, मुंबई मेट्रो वन प्रा.लि. कंपनीने त्यास आक्षेप घेतला असून, दिनांक २६ एप्रिल, २०१० रोजी प्राधिकरणासमवेत झालेल्या करारनाम्यानुसार मूळ कालावधीसाठीच म्हणजेच सदर जमीन वापराच्या १८ महिन्यांच्या कालावधीची रक्कम रुपये ५,०६,७८,४३७/- कोटी भरण्याची भूमिका मुंबई मेट्रो वन प्रा. लि. कंपनीने घेतली.

त्यानुषंगाने मुंबई मेट्रो वन प्रा. लि. कंपनी आणि मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांच्यामध्ये देय रक्कम व इतर अनुषंगिक मुद्यांबाबत लवादासमोर सुनावणी सुरु आहे. मुंबई मेट्रो वन प्रा.लि. यांना कराराचे पालन व देय रक्कम अदा करण्याबाबत वारंवार निर्देश देऊनही प्रतिसाद मिळत नसल्यामुळे त्यांचेवर कायदेशीर कारवाई व सदर रक्कम वसूल करण्यासंदर्भात मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या स्तरावर कार्यवाही सुरु आहे.

---

## भारनियमनमुक्त वीज पुरवठ्यासाठी वसूल करण्यात आलेली रक्कम ग्राहकांना परत करण्याबाबत

**(१६) ३५८३१ (०३-०१-२०१८). श्री.प्रविण दरेकर, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यात भारनियमनमुक्त वीज पुरवठा करण्यासाठी महावितरण कंपनीने वसूल केलेले रुपये ३,८०० कोटी परत करण्याची मागणी ग्राहकांनी माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान महावितरण कंपनीकडे केली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त मागणीसंदर्भात शासनाने कोणता निर्णय घेतला आहे काय, त्याचे स्वरूप काय आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (२२-०१-२०१९) :** (१) हे खरे नाही. सदर विषयाबाबत कोणताही पत्रव्यवहार माहे सप्टेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान महावितरण कंपनीकडे प्राप्त झालेला नाही.
(२) प्रश्न उद्‌भवत नाही.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील हायमास्ट दिवे बंद असल्याबाबत

**(१७) ३७०७९ (०४-०१-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.प्रविण दरेकर, डॉ.परिणय फुके :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबईतील वाहतूक बेट आणि महत्वाच्या नाक्यांवर नगरसेवकांच्या निधीतून हायमास्ट दिवे बसविण्यात आले मात्र या दिव्यांची नियमित देखभाल होत नसल्याने ९० टक्के दिवे बंद असल्याचे माहे ऑक्टोबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्‌नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-१२-२०१८) :** (१), (२) व (३) बृहन्मुंबई महानगरपालिका क्षेत्रातील वाहतूक बेट आणि महत्वाच्या नाक्यांवर महानगरपालिकेमार्फत पूर्व उपनगरमध्ये ११७, पश्चिम उपनगरमध्ये २१६ व शहरी भागात ५९ हायमास्ट दिवे बसविण्यात आले आहेत.

पूर्व आणि पश्चिम उपनगरातील सर्व हायमास्ट दिवे व्यवस्थित सुरु असून, महानगरपालिकेमार्फत त्यांची देखभाल वेळोवेळी करण्यात येते.

पूर्व आणि पश्चिम उपनगरातील सर्व हायमास्ट दिवे पुढील प्रचलन व परिरक्षणासाठी मे.एम.एस.ई.डी.एल. आणि मे.रिलायन्स एनर्जी यांना हस्तांतरीत करावयाची कार्यवाही सुरु आहे.

शहर भागातील ५९ हायमास्ट दिव्यांपैकी ५१ दिवे प्रचलन व परिरक्षणासाठी बेस्ट उपक्रमाकडे हस्तांतरीत करण्यात आले असून, सदर दिवे आजमितीस चालू आहेत.

उर्वरित ८ दिव्यांपैकी ५ हायमास्ट दिवे नायर आणि जीटीबी रुग्णालयातील परिसरात असल्याने त्यांचे प्रचलन व परिरक्षण सदर रुग्णालयातील कर्मचाऱ्यांकडून केले जाते व आजमितीस सदर दिवे चालू आहेत.

मर्दुला टँक येथे मेट्रो प्रकल्पाचे काम सुरु असल्यामुळे तेथील ३ हायमास्ट दिवे बंद ठेवण्यात आले आहेत.

---

## मुंबई महापालिकेच्या कचरामुक्ती प्रक्रियेबाबत

**(१८) ३७६०० (०४-०१-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई महापालिकेच्या आदेशानंतर अनेक सोसायटया आणि रुग्णालयांनी कचरामुक्ती प्रक्रिया राबविली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महापालिकेने सुका कचरा वर्गीकरण करणे बंधनकारक केलेले असतानाही कांदिवलीतील महापालिकेच्या डॉ.बाबासाहेब आंबेडकर सर्वसाधारण रुग्णालयात कचरा वर्गीकरणाच्या ४ खोल्या गत दोन वर्षापासून बंद अवस्थेत असल्याचे माहे नोव्हेंबर, २०१७ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, रुग्णालयातील सुका आणि जैविक कचरा मोठ्या प्रमाणात जमा होत असल्याने रुग्णांना तसेच त्यांच्या नातेवाईकांना दुर्गंधीचा त्रास सहन करावा लागत आहे, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-१२-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) कांदिवली (पश्चिम) येथील डॉ. बाबासाहेब आंबेडकर महानगरपालिका सर्वसाधारण रुग्णालय येथे महानगरपालिकेमार्फत वर्गीकरण अनुरुप कचरा गोळा करण्याकरीता वापर होत असलेल्या चार खोल्यांची साफसफाई नियमितपणे केली जाते.

कचऱ्याची दुर्गंधी पसरु नये व कचऱ्याचा दुरुपयोग होऊ नये याकरीता सदर खोल्यांना लोखंडी सरकता दरवाजा बसविण्यात आला असून, कचरा गाडी आल्यावर दरवाजा उघडून कचरा दिला जातो व नंतर दरवाजा बंद केला जातो.

(३) रुग्णालयातील सुका आणि जैविक कचऱ्याची रितसर विल्हेवाट लावण्यात येत असल्याचे बृहन्मुंबई महानगरपालिकेमार्फत कळविण्यात आले आहे.

(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्य परिवहन महामंडळाच्या नाशिक शहरातील बससेवेच्या फेऱ्या सुरू करण्याबाबत

**(१९) ३७९१२ (०५-०४-२०१८). श्री.धनंजय मुंडे : तारांकित प्रश्न क्रमांक ३४८८१ ला दिनांक १२ डिसेंबर, २०१७ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्य परिवहन महामंडळाने तोटा होत असल्याचे कारणाने नाशिक शहरात सिटी बस सेवा चालविण्यास नकार दिला असून विविध मार्गावरील फेऱ्या बंद करण्यात आलेल्या आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, राज्य परिवहन महामंडळाऐवजी नाशिक महानगरपालिकेने सिटी बस सेवा चालविण्यास संमती दर्शविली असून सिटी बस सेवेसंदर्भात क्रिसिल संस्थेने महापालिकेला प्रारुप अहवाल सादर केला असून महानगरपालिका प्रशासनाकडून सिटी बस सेवेसंदर्भात अंतिम निर्णय घेण्याची कार्यवाही सुरु आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, पीपीपी तत्वावर सिटी बस सेवा चालविण्याची महापालिकेची तयारी असून सिटी बस ताब्यात घेण्यासंदर्भातील क्रिसिलकडील अंतिम अहवाल महापालिकेस प्राप्त झाला आहे काय,

(४) असल्यास, नाशिक महानगरातील सिटी बस सेवेसंदर्भात महामंडळ व महानगरपालिकास्तरावर अंतिमतः कोणता निर्णय घेण्यात आला,
(५) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन नाशिक शहरातील शालेय विद्यार्थी, कामगार, सर्वसामान्य नागरीक, प्रवाशांची शहर बस सेवेअभावी गैरसोय होवू नये व शहर बस सेवेच्या सर्व फेऱ्या पुर्ववत नियोजनाप्रमाणेच सुरु ठेवण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(६) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (२७-११-२०१८) :** (१) नाशिक शहर बस वाहतुकीमुळे राज्य परिवहन महामंडळाच्या तोट्यात दिवसेंदिवस वाढ होत असल्यामुळे तोट्यात चालणारी शहर बस वाहतूक दिनांक ०१/०२/२०१७ रोजी पासून बंद करण्यात येईल असे राज्य परिवहन महामंडळाद्वारे नाशिक महानगरपालिकेस कळविण्यात आलेले आहे. तथापि, नाशिक महानगरपालिकेने शहर बस सेवा सुरु करेपर्यंत राज्य परिवहन महामंडळाद्वारा दिनांक १५/०६/२०१७ पासून नाशिक शहर वाहतूकीची १० नियते, १६० फेऱ्या, २०१५ कि.मी. चालविण्यात येत असून, भगूर ते महात्मानगर अशी फेरी सुरु करण्यात आली आहे.
(२), (३), (४) व (५) नाशिक शहरात बससेवा चालविण्याची जबाबदारी ही महानगरपालिकेची असल्यामुळे, नाशिक महानगर पालिकेमार्फत शहर बससेवा चालविणेकामी फिजीबीलीटी स्टडी करणेकरीता महानगरपालिका ठराव दिनांक २०/०७/२०१७ अन्वये मे.क्रिसील या संस्थेची सल्लागार म्हणून नेमणूक करणेत आलेली आहे.

क्रिसील संस्थेने प्रारुप अहवाल सादर केलेला असून, सदर अहवालानुसार नाशिक शहर बससेवा महानगरपालिकेमार्फत पी.पी.पी. तत्वावर चालविणेकरीता महासभेची मंजूरी देण्यात आली आहे.
(६) प्रश्न उद्भवत नाही.

---

## यवतमाळ जिल्ह्यातील सेवाजेष्ठ तलाठ्यांना पदोन्नती देण्याबाबत

**(२०) ३८२८८ (०५-०४-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **महसूल मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) यवतमाळ जिल्ह्यात दिनांक ४ जून, १९९८ पूर्वी तलाठ्यांना मंडळ अधिकारी या पदावर नियुक्ती दिनांकानुसार असलेल्या सेवाजेष्ठतेनुसार पदोन्नती देण्यात येत होती, तसेच, ग्रामविकास व जलसंधारण विभागाचे पत्र क्र. सेवाजे-२००८/प्र.क्र.३९/आस्था, दिनांक २१ फेब्रुवारी, २०११ अन्वये विधी व न्याय प्रवेशोत्तर परीक्षा विहित संधीत व कालावधीत उत्तीर्ण झाले नाही तरीही त्या कर्मचाऱ्यांची सेवाजेष्ठता अबाधित राखण्यात आल्या आहेत, त्यानुसार यवतमाळ जिल्ह्यातील दिनांक ४ जून, १९९८ पूर्वी नियुक्त झालेल्या व सेवेत २० वर्षे व त्यापेक्षा अधिक सेवाजेष्ठ तलाठ्यांना पदोन्नती देण्यात आलेली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, महाराष्ट्र नागरी सेवा (सेवेच्या सर्वसाधारण शर्ती) नियम, १९८१ मधील नियम ४ अन्वये नियम शिथिल करण्याचे अधिकार शासनाला असताना सुध्दा यवतमाळ जिल्ह्यातील दिनांक ४ जून, १९९८ पूर्वी नियुक्त झालेल्या व सेवेत २० वर्षे व त्यापेक्षा अधिक सेवाजेष्ठ तलाठ्यांना पदोन्नतीपासून वंचित ठेवले असून दिनांक ४ जून, १९९८ चे राजपत्र नियम ५ (१) नुसार ४ जून, १९९८ नंतर नियुक्त झालेल्या तलाठ्यांना महसूल अर्हता परीक्षा ९ वर्ष व ३ संधीमध्ये उत्तीर्ण करणे आवश्यक असताना सुध्दा ४ जून, १९९८ नंतर नियुक्त झालेल्या तलाठ्यांना ९ वर्षापूर्वीच (सन २००८ चे पूर्वीच) सेवाजेष्ठता व पदोन्नती देण्यात आली, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, यवतमाळ जिल्ह्यात कार्यरत असणाऱ्या सेवाजेष्ठ तलाठ्यांना मंडळ अधिकारी पदावर पदोन्नती मिळण्यासंदर्भात स्थानिक लोकप्रतिनिधींनी दिनांक ३० ऑगस्ट, २०१६ रोजी मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे समवेत बैठक घेण्यात आली, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून दिनांक ४ जून, १९९८ पूर्वी नियुक्त झालेल्या व सेवेत २० वर्ष व त्यापेक्षा अधिक सेवाजेष्ठ तलाठ्यांना पदोन्नती देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रकांत पाटील (२७-११-२०१८) :** (१) व (२) महाराष्ट्र महसूल अर्हता परीक्षा नियम, १९९८ अमलात येण्यापूर्वी यवतमाळ जिल्हयातील तलाठ्यांना त्यांच्या नियुक्ती दिनांकानुसार असलेल्या सेवा जेष्ठतेनुसार पदोन्नती देण्यात येत होती.

सद्या महाराष्ट्र नागरी सेवा (जेष्ठतेचे विनियमन) नियमावली १९८२, विभागीय दुय्यम सेवा परीक्षा नियम, १९९७ व महाराष्ट्र महसूल परीक्षा अर्हता नियम, १९९८ मधील तरतूदीनुसार तलाठ्यांच्या जेष्ठता सूची तयार करण्यात येतात. या नियमातील तरतूदीनुसार पात्र असणाऱ्या यवतमाळ जिल्हयातील तलाठ्यांना नियमानुसार पदोन्नती देण्यात आलेली आहे.

ग्रामविकास व जलसंधारण विभागाचे पत्र क्र.सेवाजे-२००८/प्र.क्र.३९/आस्था, मंत्रालय, मुंबई दिनांक २१ फेब्रुवारी, २०११ मधील सूचना त्या विभागाशी संबंधित बाब आहे. महसूल विभागाशी त्याचा संबंध नसल्याने त्यानुसार पदोन्नती देण्याचा प्रश्न उद्भवत नाही.
(३) व (४) यवतमाळ जिल्हयात कार्यरत असणाऱ्या तलाठ्यांना मंडळ अधिकारी पदावर पदोन्नती मिळण्यासंदर्भात स्थानिक लोकप्रतिनिधीनी दिनांक ०३ ऑगस्ट, २०१६ रोजी मा.राज्यमंत्री (महसूल) यांचे समवेत बैठक घेण्यात आली होती. सदर बैठकीच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी, यवतमाळ यांनी दिनांक ०३/०८/२०१७ च्या पत्रान्वये शासनास अहवाल सादर केला असून नियमांनुसार पात्र तलाठ्यांना पदोन्नती देण्यात येत असल्याचे अभिप्राय प्राप्त झाले आहे. त्यामुळे याप्रकरणी चौकशी करण्याचा प्रश्न उद्भवत नाही.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

## मुंबई शहरातील गच्चीवरील उपाहारगृहांबाबत

**(११) ३९६०६ (०६-०४-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.ख्वाजा बेग, श्री.रामराव वडकुते, ॲड.निरंजन डावखरे, श्री.हेमंत टकले, श्री.विक्रम काळे, श्री.किरण पावसकर, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबई शहरात गच्चीवरील उपाहारगृहांना मान्यता देण्याबाबतचे धोरण महापालिकेने स्विकारल्यानंतर मुंबई शहर व उपनगरात किती हॉटेल आस्थापनांनी उपाहारगृह सुरु करण्यास परवानगी मागितली होती त्यापैकी किती आस्थापनांना परवानगी देण्यात आली आहे,

(२) असल्यास, गच्चीवरील उपाहारगृहांना परवानगी कोणत्या अटी व शर्थीवर देण्यात आली आहे,

(३) असल्यास, सदर हॉटेल आस्थापनांनी गच्चीवरील उपाहारगृहे प्रत्यक्षात सुरु केली आहेत काय,

(४) असल्यास, अटी व शर्तीची अंमलबजावणी संबंधित हॉटेल आस्थापनाकडून काटेकोरपणे केली जाते किंवा नाही याची पहाणी करण्यासाठी कोणती यंत्रणा निर्माण करण्यात आली आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१०-१२-२०१८) :** (१) मुंबई शहरात गच्चीवरील उपाहारगृहांना मान्यता देण्याबाबतचे धोरण महानगरपालिकेने स्विकारल्यानंतर मुंबई व उपनगरात १६ हॉटेल आस्थापनांकडून अर्ज प्राप्त झाले असून, त्यापैकी ४ हॉटेल आस्थापनांना अतिरिक्त सेवा कक्षासाठी परवानगी देण्यात आली आहे.

(२) गच्चीवरील उपाहारगृहांना खालील अटी व शर्तीवर परवानगी देण्यात आली आहे :-

- भोगवटा प्रमाणपत्र असलेल्या मंजूर इमारतीमधील खुल्या गच्ची/अंशत: खुली गच्ची/सामायिक खुली गच्ची (आश्रय क्षेत्राचा भाग सोडून) वर खानपान पुरविण्याकरीता परवानगीसाठी रितसर प्रस्ताव संबंधित विभागाच्या वैद्यकीय आरोग्य अधिकारी यांच्याकडे सादर करावा.

- वहिवाटदारांना कोणताही उपद्रव होऊ नये याकरीता खुल्या गच्चीवर/पॉकेट गच्चीवर/सामायिक गच्चीवर (आश्रय क्षेत्राचा भाग सोडून) अन्नपदार्थ सेवा पुरविण्याच्या प्रस्तावासाठी केवळ व्यवसायिक वाणिज्य इमारत/खानपान व राहण्याची सोय असणाऱ्या निवासी हॉटेलांचाच विचार करण्यात यावा.
- गच्चीवर एल.पी.जी. गॅस किंवा इतर ज्वलनशिल साधन वापरुन खाद्यपदार्थ/शिजवता व बनविता येणार नाहीत. फक्त इंडक्शन/मायक्रोवेव्ह आणि इलेक्ट्रीक ओव्हनचा वापर करण्याची परवानगी देण्यात येईल.
- अन्नपदार्थ सेवा पुरविण्याकरीता वापरावयाचे गच्चीक्षेत्र कोणत्याही तात्पुरत्या/कायमस्वरुपी आवरणाने आच्छादलेले नसावे. सदर खुल्या गच्चीवर पावसाळी छत/छत्री/ताडपत्री यांचे आवरण उभारण्यास परवानगी देण्यात येणार नाही. गच्चीसाठी व आवरणासाठी कोणतीही साधने उभारता येणार नाहीत व गच्चीचा वापर सदासर्वकाळ मोकळया आकाशाखाली असावा.
- गच्चीच्या सदर वापरामुळे शेजारील इमारतींना त्रास होणार नाही किंवा त्यांची तक्रार येणार नाही याची दक्षता घ्यावी. अशा प्रकारचा त्रास होत असल्यास, देण्यात आलेली परवानगी रद्द करण्यात येईल.
- अन्नपदार्थ पुरविण्याची वेळ ही पोलीस कायदा आणि महानगरपालिका दुकाने आणि आस्थापना कायदा यातील तरतुदींनुसार असेल.
- गच्चीवरील विद्युत दिवे/रोषणाई आणि ध्वनीची तीव्रता ही सन १९८६ च्या पर्यावरण सुरक्षा कायद्याच्या संबंधित तरतुदीच्या अधीन असावी.
- अर्जदारास बृहन्मुंबई महानगरपालिका व त्यांचे अधिकारी यांस कोणताही धोका, तोडफोड, सुरक्षितता, मालमत्ता, जीवीतहानी तसेच न्यायालयीन लढाई वगैरे पासून कोणतेही नुकसान होणार नाही असे हमीपत्र दस्तऐवज (Indemnity Bond) सादर करावे लागेल.

- दुर्घटना किंवा अपघात टाळण्याकरीता परवानाधारकाने योग्य ती सुरक्षितता व दक्षतेसंदर्भात उपाययोजना योजाव्यात आणि अशा कोणत्याही दुर्घटनेस किंवा अपघातास परवानाधारक स्वतः जबाबदार राहील.
- गच्चीवर खाद्यसेवेच्या वापरासाठी परवाना दिलेल्या इमारतीच्या गच्चीच्या किनाऱ्यापासून १० मी. पर्यंत कोणतीही रहिवासी इमारत असू नये.
- जर गच्चीवर तटरक्षक भिंतीची उंची १.५ मी. पेक्षा कमी असेल तर ती जास्तीत जास्त उंची १.५ मी. पर्यंत जाळी किंवा उघडता येणाऱ्या काचेच्या तावदानाने अन्वयेच वाढवता येईल.
- परवानाधारकाने ग्राहकांना पुरविण्यात येणारे खाद्यपदार्थ खाण्यास योग्य असल्याबाबतची दक्षता घ्यावी. तसेच सदर अन्न आजुबाजूच्या झाडावरुन पडणारी पाने, पक्षांची विष्ठा, धूळ माशी यामुळे दूषित होणार नाही याबाबत दक्षता घ्यावी.
- खुल्या गच्चीस खाद्य पुरवठा करण्याची परवानगी देण्यापूर्वी मुख्य अग्निशमन अधिकारी यांचेकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करणे अनिवार्य आहे व त्यांनी सुचविलेल्या सुरक्षिततेच्या बाबींबद्दलच्या अटींची पूर्तता केली असल्याची खात्री परवानगी देण्यापूर्वी करणे.

(३) सदर २ हॉटेल आस्थापनांनी गच्चीवरील उपाहारगृहे प्रत्यक्षात सुरु केली आहेत.

(४) सदर अटी व शर्तींच्या अंमलबजावणीसाठी महानगरपालिकेमार्फत विभाग पातळीवर फायर कम्प्लायन्स सेलची स्थापना करण्यात आली असून, त्याअंतर्गत आरोग्य व स्वच्छतेच्यादृष्टीकोनातून महानगरपालिकेच्या आरोग्य विभागातील कर्मचारी व अग्निप्रतिबंधक उपाययोजनांच्या अंमलबजावणी/पुर्ततेबाबत अग्निशमन दलातील अधिकारी तसेच इमारतीच्या अनधिकृत बांधकामाबाबतची पाहणी महानगरपालिकेच्या इमारत व कारखाने विभागामार्फत करण्यात येते.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

## मंगळवेढा (जि.सोलापूर) येथील कोळी समाजाच्या मागण्याबाबत

**(२२) ४०७०५ (०३-०४-२०१८). प्रा.डॉ.तानाजी सावंत :** सन्माननीय **आदिवासी विकास मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मंगळवेढा (जि.सोलापूर) येथील कोळी समाजाने आपल्या परिवारासह दिनांक १ जानेवारी, २०१८ रोजी वा त्यासुमारास तहसिल व प्रांत कार्यालयावर विविध मागण्यांसाठी मोर्चा काढून निवेदन दिले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, मंगळवेढयातील कोळी समाजाने दिलेल्या निवेदनातील मागण्याच्या पुर्ततेसंदर्भात शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विष्णु सवरा (१०-१०-२०१८) :** (१), (२) व (३) मंगळवेढा तालुक्यातील कोळी समाजाने मोर्चा काढून उपविभागीय अधिकारी कार्यालय, मंगळवेढा यांच्याकडे दिनांक ०१/०१/२०१८ रोजी निवेदन दिले आहे हे खरे आहे. निवेदनातील जातीच्या दाखल्याच्या मागणीच्या अनुषंगाने सेतू कार्यालयामध्ये अनुसूचित जमातीच्या दाखल्याबाबत अर्जदार यांच्याकडून आवश्यक त्या कागदपत्रांसह अर्ज दाखल केल्यानंतर संबंधितांचे कायदेशीर पुरावे तपासून व प्रकरणांची शहानिशा करून मागणी केलेल्या अनुसूचित जमातीच्या दाखल्यांबाबत योग्य तो निर्णय घेण्यात येईल असे उपविभागीय अधिकारी कार्यालय मंगळवेढा यांच्याकडून दिनांक ०७/०२/२०१८ रोजी आदिवासी कोळी समाज कृती संघटना, मंगळवेढा यांना कळविण्यात आले आहे.

---

## राज्यातील वैद्यकिय महाविद्यालयातील सिकलसेल थॉलेसिमिया टेस्टींग मशीन्स बंद असल्याबाबत

**(२३) ४०८७६ (०४-०४-२०१८). श्री.ख्वाजा बेग :** सन्माननीय **वैद्यकीय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील वैद्यकिय महाविद्यालयातील सिकलसेल थॉलेसिमिया टेस्टींग मशीनद्वारे रुग्णांची चाचणी केली जाते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर चाचणीकरीता बायोरेड कंपनीची टेस्टींग मशीन BMRK मार्फत सन २००७-०८ मध्ये बसविण्यात आल्या होत्या, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर यंत्राची १० वर्ष देखभाल व री-एजन्ट पुरवण्याची जबाबदारी मशीन पुरवठादार यांची असून सन २०१४ पासून ह्या टेस्टींग मशीन बंद आहेत, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन सदर मशीन सुरु करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीष महाजन (२०-११-२०१८) :** (१) हे खरे आहे.

(२) हे खरे आहे.

(३) हे अंशत: खरे आहे.

सदर मशीनवर काही संस्थेमध्ये सन २०१५ व २०१६ पर्यंत चाचण्या करण्यात आल्या होत्या.

(४) थॉलेसिमिया सिकलसेल रुग्णांची तपासणी खालील यंत्राद्वारे करण्यात येत आहे :-

१. फुल्ली ॲटोमॅटीक इलेक्ट्रोफोरेसिस.
२. सोलुबीलीटी टेस्ट.
३. नेस्टॉफ टेस्ट.
४. सिकलींग टेस्ट.
५. पी.एस.तपासणी.
६. रेटीककाऊन्ट तपासणी.
७. जेल ॲप्रेटस.
८. ३ पार्ट हेमॅटोलॉजी डिफन्शीयल ब्लड सेल काऊंटर.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## जलपुर्ती सिंचन विहिरी धडक कार्यक्रमांतर्गत लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या कृषी वीजपंप पुरवठ्याची माहिती मिळणेबाबत

**(२४) ४०९२३ (१३-०५-२०१३). श्री.शरद रणपिसे** : सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) चांदूर रेल्वे, धामणगाव रेल्वे व नांदगाव खंडेश्वराचा उपविभागासाठी जलपुर्ती सिंचन विहीरी धडक कार्यक्रमांतर्गत लाभार्थ्यांना देण्यात आलेल्या कृषी वीजपंप पुरवठा कनेक्शनची सविस्तर माहिती मिळण्याकरीता मा.स्थानिक लोकप्रतिनिधी यांनी कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, अमरावती यांना दिनांक ४ जून, २०१२ रोजी वा त्यादरम्यान लेखी निवेदन आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निवेदनानुसार सविस्तर माहिती उपलब्ध करुन देण्याबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (२२-०१-२०१९)** : (१) होय, हे खरे आहे.

(२) सदर निवेदनानुसार मा.लोकप्रतिनिधी यांना अमरावती ग्रामीण विभागीय कार्यालयाचे पत्र क्र. EE/Amt/R/६३८६ दिनांक १२/१०/२०१२ नुसार कळविण्यात आले असून, त्यांना कृषीपंप वीज जोडणी संबंधी सविस्तर माहिती दिली आहे.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मौजे एकशिव (ता.माळशिरस, जि.सोलापूर) येथे निरा नदीवर बंधारा बांधून पाणीटंचाई दूर करण्याबाबत

**(२५) ४१२११ (०४-०४-२०१८). ॲड.रामहरी रुपनवर** : सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे एकशिव (ता.माळशिरस, जि.सोलापूर) येथे निरा नदी असतानाही येथे व परिसरातील गावांत उन्हाळयात पाणीटंचाई निर्माण होऊन पिण्याच्या पाण्याची व जनावरांच्या पाण्याची गैरसोय होत आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, निरा नदीचे वाहून जाणारे पाणी अडवण्यासाठी बंधारा बांधल्यास नदीपात्र मोठे असल्याने जलसाठा होऊन परिसरातील विहीरीतील पाण्याची पातळी वाढून बंधारा झाल्याने परिसरातील गावांसह इंदापूर व माळशिरस तालुक्यातील शेतकऱ्यांनाही याचा फायदा होईल, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, सदर नदीवर बंधारा व्हावा यासाठी मा.लोकप्रतिनिधीनी वारंवार मागणी केलेली असूनही प्रवाही विभागाकडे मंजूरीसाठी प्रलंबित आहे, हे खरे आहे काय,

(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन निरा नदीवर बंधारा बांधण्यासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (०५-१२-२०१८) :** (१) व (२) होय, हे खरे आहे.

(३) नाही.

(४) प्रस्तुत प्रकरणी बंधारा होणेबाबत मा.लोकप्रतिनिधीनी मागणी केलेली आहे. त्यानुषंगाने कामाचे सर्वेक्षण सुरू असून, लवकरात लवकर प्रस्ताव सादर करणेबाबत कार्यवाही करण्यात येत आहे.

(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## माटुंगा, मुंबई येथील लेबर कॅम्प रस्त्यावर अनधिकृत पार्किंग हटविण्याबाबत

**(२६) ४१७८३ (०२-०८-२०१८). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप, श्री.शरद रणपिसे, ॲड.रामहरी रुपनवर, ॲड.हुस्नबानू खलिफे, श्री.आनंदराव पाटील :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) माटुंगा, मुंबई येथील लेबर कॅम्प रस्त्यावर अनधिकृत पार्किंग असल्याने येथील रहिवाशांच्या अनेक समस्यांना समोरे जावे लागत असून अनधिकृत पार्किंगमुळे सदर ठिकाणचा रस्ता अतिशय निमुळता झाल्याने प्रवाशांना जाण्या-येण्यास अडचणी होत असल्याचे माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त रस्त्यावरील अनधिकृत पार्किंग हटविण्याबाबत तक्रारी करुनही वाहतूक विभाग दुर्लक्ष करीत आहे, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन अनधिकृत पार्किंग हटविण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२८-१२-२०१८) :** (१) हे खरे आहे.
(२) नाही.
(३) माटुंगा लेबर कॅंप परिसरातील मदर तेरेसा मार्ग, डॉ.बाबासाहेब आंबेडकर रोड व महर्षी वाल्मिकी रोड हे रस्ते अरुंद असून आजूबाजूस झोपडपट्टीने व्यापलेले आहेत. माटुंगा लेबर कॅंप परिसरातील नागरीकांना त्यांची वाहने पार्क करण्याकरीता पार्किंगची सुविधा उपलब्ध नसल्याने त्यांची वाहने नमूद रस्त्यांवर एका बाजूस पार्क केली जातात. त्यामुळे रस्त्यांची रुंदी आणखी कमी होऊन वाहतुकीस अडचण निर्माण होते.

माहिम वाहतूक विभागामार्फत माहे एप्रिल, २०१८ मध्ये ४५६ मोटार वाहनांवर कारवाई करण्यात आलेली आहे. तर माहे जानेवारी, २०१८ ते माहे ऑक्टोबर, २०१८ या कालावधीत अनधिकृतपणे पार्क केलेल्या एकूण ४,८८१ वाहनांवर मोटार वाहन कायद्यान्वये कारवाई करण्यात आलेली आहे. तसेच यापुढेही रस्त्यांवर अनधिकृतपणे पार्क केलेली वाहने आढळल्यास त्या वाहनांवर कारवाई करण्याच्या सूचना देण्यांत आलेल्या आहेत.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## कल्याण (जि.ठाणे) शहरातील भटाळे तलावाच्या जागेवरील आरक्षणे विखंडीत करण्यास शासनाकडून विलंब होत असल्याबाबत

**(२७) ४१७८९ (०२-०८-२०१८). श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) कल्याण (जि.ठाणे) शहरात महाराष्ट्र प्रादेशिक नगररचना अधिनियम १०६६ चे कलम ३१(१) अन्वये दिनांक ३ सप्टेंबर, २००५ रोजी शासनाने काही भाग (E.P.) वगळून भागश: सेक्टर १ च्या मंजूर केलेल्या विकास योजनेत अस्तित्वातील भटाळे तलावाच्या जागेवर आरक्षण क्र. ८५ वाहतूक नियंत्रण कक्ष (भागश:), आरक्षण क्र. ८६ छोटे ट्रक वाहनतळ, आरक्षण क्र. ८७ बगीचा व आरक्षण क्र. ८८ प्राथमिक शाळा (भागश:) इत्यादी आरक्षणे प्रस्तावित करण्यात आली आहेत, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी प्रारूप विकास आराखडा तयार करताना सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व पर्यावरणासंदर्भातील नियमांचे उल्लंघन झाल्याने कल्याण डोंबिवली महानगरपलिका सर्वसाधारण सभा क्र. ६ दिनांक १ सप्टेंबर, २००८ विषय क्र. २३ व ठराव क्र. ४२ व ठराव क्र. ८७ सभा क्र. १२ विषय क्र. १५ दिनांक २३ फेब्रुवारी, २०१० नुसार सदरहू आरक्षणे विखंडीत करण्याबाबत कल्याण-डोंबिवली मनपाने प्रधान सचिव, नगरविकास विभाग यांना दिनांक ८ जून, २०१० रोजी व त्यानंतर सविस्तर प्रस्ताव सादर केलेला आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, मा.सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार पर्यावरण संतुलनासाठी जलस्त्रोत्र बुजविण्यास प्रतिबंध असल्याने शासनाने कल्याण शहरातील नैसर्गिक जलस्त्रोतांचे संवर्धन करण्यासाठी सदरहू ठराव विखंडीत करण्याची कारवाई आजमितीस केलेली नाही, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (०६-११-२०१८) :** (१) होय.

(२) व (३) कल्याण-डोंबिवली शहराच्या सेक्टर-१ ची विकास योजना शासनाने दिनांक ०३/०९/२००५ रोजीच्या अधिसूचनेन्वये मंजूर केली आहे. सदरच्या

मंजूर विकास योजनेनुसार मौजे कल्याण येथील दुर्गाडी किल्ल्याजवळील भटाळे तलावावर आ.क्र.८५-वाहतूक नियंत्रण कक्ष (भागश:), आ.क्र.८६-मिनी ट्रक पार्किंग, आ.क्र.८७-बगिचा व आ.क्र.८८-प्राथमिक शाळा (भागश:) ही आरक्षणे आहेत. भटाळे तलावावरील मंजूर विकास योजनेतील प्रस्तावित आरक्षणे विखंडीत करुन सदर तलावाचे सुशोभिकरण हे जवाहरलाल नेहरु राष्ट्रीय नागरी पुनरुत्थान अभियानअंतर्गत प्राप्त होणाऱ्या निधीतून करण्यात यावे, असा ठराव क्र.४२, दिनांक ५/९/२००८ महानगरपालिकेने पारित केला आहे. त्याप्रमाणे कल्याण-डोंबिवली शहराच्या सेक्टर-१ च्या मंजूर विकास योजनेनुसार मौजे कल्याण येथील दुर्गाडी किल्ल्याजवळील भटाळे तलावावरील आ.क्र.८५-वाहतूक नियंत्रण कक्ष (भागश:), आ.क्र.८६-छोटे ट्रक वाहनतळ, आ.क्र.८७-बगीचा, आ.क्र.८८-प्राथमिक शाळा (भागश:) ही आरक्षणे वगळण्याच्या महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम ३७ चा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेकरीता दिनांक ८/६/२०१० च्या पत्रान्वये सादर केला होता. सदरचा फेरबदल प्रस्ताव शासनाने कलम ३७ चे पोटकलम (२) अन्वये दिनांक ०२/०८/२०१८ रोजीच्या अधिसूचनेन्वये मंजूर केला आहे.
(४) व (५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## पालघर जिल्हा परिषदेत शिपाई पदांची बेकायदा भरती केल्याप्रकरणी चौकशी करण्याबाबत

**(२८) ४१८६१ (०१-०८-२०१८). श्रीमती विद्या चव्हाण, श्री.किरण पावसकर, श्री.धनंजय मुंडे : तारांकित प्रश्न क्रमांक ३८५८७ ला दिनांक २३ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **शालेय शिक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) पालघर जिल्हा परिषदेत तसेच राज्यभरात अपंग एकात्मिक शिक्षण योजनेंतर्गत आर्थिक गैरव्यवहार करून प्रत्येकी उमेदवाराकडून रुपये १५ ते १७ लाख घेवून पालघर जिल्ह्यात ८० शिपायांची बोगस भरती करण्यात आली असून जवळपास ५०० ते ६०० कोटी रुपयांचा भ्रष्टाचार झाला, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणाची चौकशी करण्यासाठी दिनांक २३ मार्च, २०१८ रोजी विधान परिषदेच्या सभागृहात मा.शालेय शिक्षण मंत्री यांनी अर्थसंकल्प अधिवेशन संपताच एसआयटी (विशेष चौकशी पथक) नेमण्याचे जाहीर केले होते, हे ही खरे आहे काय,
(३) असल्यास, सदर पालघर जिल्हा परिषदेतील संबंधित अधिकारी तसेच मंत्रालयातील अधिकृत व अनधिकृतपणे सहकार्य करणाऱ्यांवर एसआयटी अंतर्गत प्रशासकीय वा दंडात्मक कारवाई करण्याबाबत समर्थन संस्थेने दिनांक ६ एप्रिल, २०१८ रोजी शासनाकडे लेखी निवेदनाद्वारे मागणी केलेली आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करून पालघर जिल्हा परिषदेत शिपाई पदांची बेकायदा भरती केल्याप्रकरणी गैरव्यवहाराची चौकशी करण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.विनोद तावडे (०६-१२-२०१८) :** (१), (२), (३) व (४) सदर प्रकरणाची सखोल चौकशी करण्यासाठी शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. एसटीएफ़-१०१८/प्र.क्र.७६/टिएनटी-५, दिनांक २१ मे, २०१८ अन्वये विशेष चौकशी पथकाची स्थापना करण्यात आलेली आहे.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील व्यवसाय अभ्यासक्रमातील (एचएससी, व्होकेशन) शिक्षक व विद्यार्थ्यांच्या न्याय मागण्या प्रलंबित असल्याबाबत

**(२९) ४१९७५ (०२-०८-२०१८). प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास : तारांकित प्रश्न क्रमांक ३९०६९ ला दिनांक ७ मार्च, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **कौशल्य विकास व उद्योजकता मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील व्यवसाय अभ्यासक्रमातील (एचएससी, व्होकेशन) शिक्षक व विद्यार्थ्यांच्या न्याय मागण्या गत अनेक वर्षापासून प्रलंबित असल्याने संघटनेच्यावतीने नागपूर येथे सन २०१७ च्या हिवाळी अधिवेशनात धरणे आंदोलन करण्यात आले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, उक्त संघटनेच्या प्रलंबित मागण्यांच्या अनुषंगाने शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.संभाजी पाटील-निलंगेकर (२६-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
(२) व (३) महाराष्ट्र राज्य कनिष्ठ महाविद्यालयीन व्यवसाय शिक्षण कर्मचारी महासंघ आणि व्होकेशनल इन्स्टक्टर्स टिचर्स असोसिएशन (विटा संघटना) यांच्या मागण्यांच्या अनुषंगाने दिनांक १८/१२/२०१७ रोजी नागपूर येथे मा.मंत्री, कौशल्य विकास व उद्योजकता यांचे अध्यक्षतेखाली बैठक झाली. सदर बैठकीमध्ये सदर संघटनेच्या मागण्याबाबत तपासून कार्यवाही करण्याचे निदेश देण्यात आलेले आहेत.

---

## राज्य परिवहन मंडळाचे थांबे असलेल्या हॉटेल चालकांकडून योग्य अल्पोपहार दिला जात नसल्याबाबत

**(३०) ४२०९१ (०२-०८-२०१८). श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.नागोराव गाणार, श्रीमती स्मिता वाघ, श्री.रामनिवास सिंह, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.प्रविण दरेकर : दिनांक २२ डिसेंबर, २०१७ रोजी सभागृहाच्या पटलावर ठेवण्यात आलेल्या अतारांकित प्रश्नोत्तरांच्या यादी क्रमांक ८ मधील प्रश्न क्रमांक ३१८१९ ला दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **परिवहन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्य परिवहन महामंडळाचे प्रवासी तिकीट दाखवून महामार्गालगत असलेल्या उपाहारगृहात रुपये ३० मध्ये नाश्ता मिळण्याची योजना राज्य परिवहन महामंडळामार्फत सुरु करण्यात आली असून सदर योजनेत महामार्गावरील हॉटेल मालकांकडून प्रवाशांना रुपये ३० मध्ये फक्त अर्धा कप चहा आणि नावापुरता नाश्ता मिळत असल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, हॉटेल मालकांवर महामंडळाचे नियंत्रण नसल्यामुळे पैसे देऊनही प्रवाशांना योग्य अल्पोपहार मिळत नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने प्रवाशांची फसवणूक करणाऱ्या हॉटेल मालकांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.दिवाकर रावते (२७-११-२०१८) :** (१), (२) व (३) राज्य परिवहन प्रवाशांकरीता रुपये ३०/- मध्ये चहा व नाश्त्याची सोय यामध्ये दोन नग बटाटेवडे, दोन नग मेदूवडे, उपमा, शिरा, पोहे यापैकी एक याचा समावेश असून, राज्य परिवहन महामंडळाने नेमून दिलेल्या अधिकृत हॉटेल थांब्यावर उपलब्ध केली आहे.

यासंबंधी प्रवाशांकडून तक्रार प्राप्त झाल्यास, सदर तक्रारीमध्ये चौकशीअंती तथ्य आढळल्यास महामंडळामार्फत हॉटेल थांबा तात्काळ बंद करण्याबाबतच्या सूचना प्रसारीत करण्यात आलेल्या आहेत. त्याप्रमाणे मुंबई-पुणे मार्गावरील हॉटेल ‘फुडमॉल’, पुणे-भोर-महाड मार्गावरील हॉटेल ‘आयुषा’ तसेच पुणे-नाशिक मार्गावरील हॉटेल ‘इंद्रप्रस्थ’ यांनी प्रवाशांना रुपये ३०/- मध्ये चहा अधिक अल्पोपहार देण्याच्या अटीचे उल्लंघन केल्यामुळे राज्य परिवहन महामंडळाद्वारे त्यांचा थांबा तात्काळ रद्द करण्यात आला आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील पोलीस ठाण्यातील कोठडीत मृत्यू तसेच गैरप्रकारांना आळा घालण्याकरीता सीसीटीव्ही बसविण्याबाबत

**(३१) ४२२३७ (०२-०८-२०१८). श्री.ख्वाजा बेग, श्री.हेमंत टकले, श्री.आनंद ठाकूर, ॲड.राहुल नार्वेकर, श्री.धनंजय मुंडे, श्री.किरण पावसकर, श्री.विक्रम काळे, श्री.सतिश चव्हाण, श्रीमती विद्या चव्हाण, श्री.जगन्नाथ शिंदे, श्री.रामराव वडकुते :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील पोलीस ठाण्यात होणाऱ्या कोठडीतील मृत्यू तसेच इतर गैरप्रकारांना आळा घालण्यासाठी मुंबई पाठोपाठ राज्यातील १,१०० पोलीस

ठाण्यात सीसीटीव्ही बसविण्याचा निर्णय शासनाने माहे मार्च, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान घेतला आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, शासनाला याकरीता किती खर्च येणार आहे तसेच दिनांक ३१ मे, २०१८ अखेर पर्यंत किती पोलीस स्टेशनमध्ये सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यात आले आहेत,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (११-१२-२०१८) :** (१) होय.
(२) दिनांक २६/०३/२०१८ च्या शासन निर्णयान्वये राज्यातील ११०० पोलीस ठाण्यांमध्ये सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्यासाठी येणाऱ्या रुपये ७२.६० कोटी एवढ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. राज्यातील ११०० पोलीस ठाण्यांमध्ये सीसीटीव्ही कॅमेरे बसविण्याबाबत कार्यवाही माहिती व तंत्रज्ञान विभागाच्या अंतर्गत असलेल्या महाराष्ट्र माहिती तंत्रज्ञान महामंडळाकडून करण्यात येत आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात खाद्यान्नामध्ये भेसळ करणाऱ्यांवर कारवाई करण्याबाबत

**(३२) ४२३६४ (०१-०८-२०१८). डॉ.परिणय फुके :** सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात खाद्यान्नातील भेसळीमुळे नागरीकांचे आरोग्य धोक्यात आल्याचे माहे मार्च, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले असून सणासुदीच्या काळात व लग्न समारंभाच्या वेळेस खाद्यान्नामध्ये भेसळीचे प्रमाण सर्वाधिक असून त्यात बेकरी, उपहारगृह व रेस्टोरन्टमध्ये मिळणारे खाद्यान्न हे दुय्यम दर्जाचे असते, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, खाद्यान्नात तेल, गहू, तांदूळ, साखर, डाळ, रवा, बेसन, मिठाई व बेकरीत तयार होणाऱ्या पदार्थांची विक्री करणारे ठोक व्यापारी ते किरकोळ विक्रेते भेसळ करीत असल्याबाबतच्या तक्रारी नागरिकांनी ग्राहक संरक्षण विभागाकडे केल्या आहेत, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, खाद्यान्नामध्ये होत असलेल्या भेसळीकडे अन्न धान्य व औषध प्रशासन अधिकाऱ्यांचे दुर्लक्ष होत असल्यामुळे नागरीकांना अनेक जीवघेण्या आजारांना सामोरे जावे लागत आहे, हे ही खरे आहे काय,
(४) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन खाद्यान्नामध्ये भेसळ करणाऱ्या ठोक व्यापाऱ्यांपासून ते किरकोळ विक्रेत्यांवर अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(५) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (१६-०१-२०१९) :** (१), (२) व (३) हे खरे नाही.
(४) अन्न व औषध प्रशासनाकडे प्राप्त तक्रारीच्या अनुषंगाने तसेच नियमित व विशेष मोहिमा आखून अन्न आस्थापनांची तपासणी केली जाते व खाद्यान्नामध्ये भेसळ करणाऱ्यांवर अन्न सुरक्षा व मानदे कायद्यांतर्गत कारवाई करण्यात येते.
(५) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यात पदवीधर व दुहेरी पदवीधर तरुण कमी अर्हता असलेल्या पोलीस दलात नोकऱ्या करीत असल्याबाबत

**(३३) ४२५०८ (०२-०८-२०१८). डॉ.सुधीर तांबे, श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यात बेरोजगारीचा आलेख उंचावत असून पदवीधर व दुहेरी पदवीधर तरुण कमी अर्हता असलेल्या पोलीस दलात नोकऱ्या करीत असल्याचे माहे एप्रिल, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन तरुणांना त्यांच्या योग्यतेच्या नोकऱ्या देण्याबाबत तसेच राज्यातील बेरोजगारी निर्मुलनासाठी कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (१५-१२-२०१८) :** (१) पोलीस शिपाई पदासाठी किमान शैक्षणिक अर्हता १२ उत्तीर्ण अशी आहे. तथापि, पदवीधर व दुहेरी पदवीधर उमेदवारांना आवेदन अर्ज भरण्यास प्रतिबंध घालता येत नाही.
(२) व (३) बेरोजगार उमेदवारांसाठी ग्रंथालय सदृश अभ्यासिका निर्माण करणे, बेरोजगार उमेदवारांना तात्काळ नोकऱ्या उपलब्ध करण्यासाठी रोजगार मेळावे आयोजित करणे, बेरोजगारांच्या सेवा सहकारी संस्था स्थापन करणे, आदिवासी उमेदवारांसाठी कौशल्य विकास, रोजगार व उद्‌योजकता माहिती व मार्गदर्शन केंद्र, प्रोत्साहन कार्यक्रम, महाराष्ट्र राज्यात व्यवसाय मार्गदर्शन व समुपदेशन केंद्र स्थापन करणे, प्रमोद महाजन कौशल्य व उद्‌योजकता विकास अभियान तसेच स्वयंरोजगारासाठी अण्णासाहेब पाटील आर्थिक मागास विकास महामंडळ, मुंबई यांच्याकडून वैयक्तिक कर्ज व्याज परतावा योजना, गट कर्ज व्याज परतावा योजना व गट प्रकल्प कर्ज योजना या योजना राबविण्यात येतात.

---

## कल्याण (जि.ठाणे) येथील प्राधिकृत शिधावाटप दुकानाचा परवाना परस्पर अन्य व्यक्तीकडे वर्ग केल्याबाबत

**(३४) ४२७२३ (०१-०८-२०१८). श्री.धनंजय मुंडे :** सन्माननीय **अन्न व नागरी पुरवठा आणि ग्राहक संरक्षण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) कल्याण (जि.ठाणे) येथील मोहम्मद अली चौकात ३८ फ २४ या क्रमांकाच्या भुपतराय नागरदास जेसानी यांच्या नावे असलेला प्राधिकृत शिधावाटप दुकानाचा परवाना परवानाधारकाच्या मृत्यूनंतर परस्पर अन्य व्यक्तींच्या नावे वर्ग करण्यात आल्याचे सन २०१८ मध्ये निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त दुकानाचे प्राधिकारपत्र मृत व्यक्तीच्या वारसांच्या नावे न करता अन्य व्यक्तीच्या नावे करण्याच्या बेकायदेशीर कार्यवाहीबाबतची चौकशी विभागाने केली आहे काय,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी करुन दुकानाचे प्राधिकारपत्र मृत व्यक्तींच्या वारसांच्या नावे करण्याबाबत कार्यवाही करुन दोषी अधिकाऱ्यांविरुध्द कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (३०-०८-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.

उपनियंत्रक शिधावाटप फ परिमंडळ कार्यालयाने दुकान क्रमांक ३८ फ २४ च्या प्राधिकारपत्रात त्यांच्या दिनांक ३०/०८/२००३ च्या आदेशान्वये श्री.सकरलाल जगजीवन व श्री.भोगीलाल सकरलाल यांच्या निधनानंतर त्यांची प्राधिकारपत्रातील नावे कमी करुन त्यांचे वारस या नात्याने श्री.नरेंद्र भोगीलाल व श्री.अशोक भोगीलाल यांच्या नावे प्राधिकारपत्र करण्याची कार्यवाही करण्यात आली आहे. सदर प्राधिकारपत्र दिनांक ३१/१२/२०१९ पर्यंत वैध आहे.
(३) व (४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## रक्त पेढ्यांवर कारवाई करण्याबाबत

**(३५) ४२९१९ (०१-०८-२०१८). ॲड.अनिल परब :** सन्माननीय **अन्न व औषध प्रशासन मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१)मुंबईतील ५५ टक्के रक्त पेढ्यांची मागील काही महिन्यांमध्ये अन्न व औषध प्रशासनाने तपासणी केली आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुषंगाने किती रक्त पेढ्यांवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.गिरीश बापट (२८-११-२०१८) :** (१) अन्न व औषध प्रशासनामार्फत मुंबई कार्यक्षेत्रातील दिनांक ०१/०१/२०१८ ते दिनांक ३१/०५/२०१८ पर्यंत एकूण ७६% रक्तपेढ्यांची तपासणी करण्यात आली आहे.

(२) उक्त कालावधीत रक्तपेढ्यांच्या केलेल्या तपासणीमध्ये ३२ पेढ्यांचे दोष गंभीर स्वरुपाचे नसल्याने सदर दोषाचे निराकारण करण्याबाबत संबंधित पेढ्यांना कळविण्यात आले होते. त्यानुषंगाने संबंधित पेढ्यांनी दोषाचे निराकरण केले आहे.

दिनांक ०१/०१/२०१८ पूर्वी तपासणी करण्यात आलेल्या २ रक्तपेढ्यांचे परवाने निलंबित करण्यात आले आहेत.

(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## राज्यातील नद्‌या पुनर्जीवन प्रकल्पामध्ये गांधारी पुनर्जीवन प्रकल्पांतर्गत सिमेंट बंधारे बांधण्यासाठी संयुक्त बैठक आयोजित करण्याबाबत

**(३६) ४३३३१ (०१-०८-२०१८). श्री.प्रविण दरेकर :** सन्माननीय **जलसंधारण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील नद्‌या पुनर्जीवन प्रकल्पामध्ये गांधारी पुनर्जीवन प्रकल्पांतर्गत सिमेंट बंधारे बांधण्यासाठी संयुक्त बैठक आयोजित करण्याबाबत लोकप्रतिनिधींनी दिनांक १६ मार्च, २०१८ रोजी वा त्यासुमारास लेखी निवेदन दिले होते, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर निवेदनानुसार शासनाने यासंदर्भात बैठक आयोजित केली नाही, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीच्या अनुषंगाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**प्रा. राम शिंदे (२०-११-२०१८) :** (१) व (२) अंशत: खरे आहे.

(३) व (४) शासन पत्र दिनांक १०/८/२०१७ अन्वये नदी पुनर्जीवन कार्यक्रमांतर्गत महाड तालुक्यातील गांधारी नदीवर ११ सिमेंट बंधारे कामांसाठी रुपये २५०.०० लक्ष निधी मंजूरीस तत्वत: मान्यता देण्यात आली आहे. त्यानुसार जिल्हा जलसंधारण अधिकारी, ठाणे यांचेमार्फत सर्वेक्षण व

अन्वेषणाचे काम पूर्ण करण्यात आले आहे. शासनाच्या प्रचलित मापदंडात बसत असलेल्या ११ पैकी ६ सिमेंट बंधाऱ्यांना तांत्रिक मान्यता प्रदान करण्यात आली आहे.

---

## जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकानी शासनाची कोणतीही मान्यता न घेता नोकरभरती केल्याबाबत

**(३७) ४३४२९ (०१-०८-२०१८). श्री.आनंदराव पाटील** : सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील सर्व जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकामध्ये नोकरीभरतीची प्रक्रिया करताना राज्य शासनाची मान्यता घेऊनच नोकरभरती करण्यात येत होती, परंतु सन २०१६ नंतर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकानी शासनाची कोणतीही मान्यता न घेता नोकरभरती करण्यात आल्याचा गंभीर प्रकार माहे मार्च, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आला आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकामध्ये नोकरभरती करतेवेळी शासनाची मान्यता न घेता नोकर भरती करण्यास जबाबदार असणाऱ्या संबंधित दोषींवर शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (२०-१२-२०१८)** : (१) अंशतः खरे आहे,

नाशिक जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेस नोकरभरतीस परवानगी दिलेली नाही. तरीही बँकेने ४०० कर्मचाऱ्यांची तात्पुरत्या कालावधीकरीता नोकरभरती केलेली आहे.

(२) व (३) सदर प्रकरणी विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, नाशिक यांच्याकडे प्राप्त तक्रारीच्या अनुषंगाने चौकशी करुन सदर कर्मचाऱ्यांना कमी करण्याचे निर्देश दिलेले आहे. सदर कर्मचाऱ्यांनी या प्रकरणी मे. कामगार

न्यायालय, नाशिक येथे अर्ज दाखल केला असून त्यांचे अर्जावर मे. कामगार न्यायलयाने दिनांक ११/०८/२०१६ रोजी जैसे थे परिस्थिती ठेवण्याचे निर्देश दिलेले आहे. सदर कर्मचाऱ्यांना मे. न्यायालयाच्या आदेशानुसार कमी करण्यात आलेले नाही. तरी सदर प्रकरण न्यायप्रविष्ट आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## औरंगाबाद येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयात (घाटी) वैद्यकीय तपासणीसाठी आणलेले आरोपी पळून गेल्याबाबत

**(३८) ४३६५९ (०२-०८-२०१८). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) औरंगाबाद येथील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालयात (घाटी) वैद्यकीय तपासणीकरीता आणलेल्या २ आरोपींनी तीन पोलिसांना चकवा देऊन दिनांक २२ एप्रिल, २०१८ रोजी वा त्यासुमारास पळून गेल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त ठिकाणी आरोपी पळून जाण्याची घटना १५ दिवसात दोन वेळा घडल्याने याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीमध्ये काय आढळून आले व त्यानुसार पळून गेलेल्या कैद्याना पकडण्याच्यादृष्टीने तापर्यंत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२२-११-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे.
सदर आरोपी दिनांक २२ एप्रिल,२०१८ रोजी पळून गेले नसून दिनांक २३ एप्रिल,२०१८ रोजी पळून गेले आहेत.
(२) दिनांक २३/०४/२०१८ रोजी औरंगाबाद येथील घाटी रुग्णालयातून पलायन केलेल्या दोन बंदयापैकी न्यायाधीन बंदी अक्षय शामराव आठवले यास त्याच दिवशी दिनांक २३/०४/२०१८ रोजी अटक करुन कारागृहात दाखल केले आहे. तसेच दुसरा शिक्षाबंदी नामे सोनू दिलीप वाघमारे हा अद्यापपर्यंत कारागृहात दाखल झालेला नाही. सदर पलायनाबाबत बेगमपुरा पोलीस स्टेशन औरंगाबाद

येथे गु.र.नं. ७१/२०१८ कलम २२४, ३०७, ३५३, ३३३ सह ३४ भा.दं.वि. अन्वये दिनांक २३/०४/२०१८ रोजी गुन्हा दाखल केला आहे. तसेच, दिनांक ०४/०५/२०१८ रोजी औरंगाबाद येथील शासकीय रुग्णालयातून पलायन केलेला न्यायाधीन बंदी नामे वाहेद शेख मोसीन ऊर्फ असद यास बेगमपुरा पोलीस स्टेशन, औरंगाबाद यांनी गु.र.नं. ७८/२०१८ कलम २२४ भा.दं.वि. अन्वये अटक करुन दिनांक १२/०६/२०१८ रोजी कारागृहात दाखल केले आहे.

पोलीस स्टेशन बेगमपुरा गु.र.नं. ७१/२०१८ मधील घटनेतील आरोपीस पळून जाण्यास जबाबदार असलेल्या दोन पोलीस हवालदार/पोलीस शिपाई यांना कारणे दाखवा नोटीस देण्यात आली असून पुढील कार्यवाही प्रस्तावित आहे. तसेच पोलीस स्टेशन बेगमपुरा गु.र.नं. ७८/१८ मधील घटनेतील आरोपी पळून जाण्यास जबाबदार असलेले दोन पोलीस हवालदार/पोलीस शिपाई यांना त्यांचे कसुरीबाबत देय वार्षिक वेतनवाढ पुढील वेतनावर परिणाम न होता एक वर्षे स्थगित करण्याची शिक्षा देण्यात आली आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## गडचिरोली जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेच्या जाहिरातीमध्ये अनुसूचित जाती व जमाती याकरीता पदांची नोंद नसल्याबाबत

**(३९) ४३७६७ (०१-०८-२०१८). प्रा.जोगेन्द्र कवाडे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) गडचिरोली जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेत दिनांक ५ फेब्रुवारी, २०१८ रोजी लिपिक ५२ व ज्युनियर लिपिक ६ या पदासाठी देण्यात आलेल्या जाहिरातीमध्ये अनुसूचित जाती व जमाती याकरीता पदांची नोंद नसल्याचे माहे मे, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, अनुसूचित जाती व जमातींचा अनुशेष भरण्याबाबत जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकाना आदेश देण्याबाबत कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) असल्यास, उपरोक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुभाष देशमुख (१९-१२-२०१८) :** (१) होय.
(२) व (३) बँकेस दिनांक ३०/०५/२०१६ पर्यंत आरक्षण अधिनियम लागू होता. त्यानुसार दिनांक ३१/०३/२०१६ अखेर सदर बँकेत ज्युनिअर ऑफीसर संवर्गात ६ व लिपिक संवर्गात ६ अशी अनुशेषाची एकूण १२ पदे भरणे आवश्यक होते परंतु बँकेने सर्व पदे खुल्या प्रवर्गातून भरल्याने सदर प्रकरणी जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेकडून खुलासा मागविण्यात आला असून मुख्य कार्यकारी अधिकारी यांना याप्रकरणी विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था, नागपूर येथे समक्ष सुनावणीस बोलावून त्यांचे लेखी म्हणणे दाखल करून घेतलेले आहे. ज्युनिअर ऑफीसर व लिपीकांची अनुक्रमे ०६ व ०१ रिक्त पदे अनुशेष मोहीमेंतर्गत त्वरीत भरण्याकरीता बँकेस निर्देशित केलेले आहे. त्यासोबतच याप्रकारे अंशत: अनुशेष भरल्यानंतर रिक्त राहिलेली लिपिक संवर्गातील ०५ अनुशेषाची पदे पदोन्नती, सेवानिवृत्ती इत्यादी कारणामुळे रिक्त झाल्यानंतर तात्काळ भरणा करण्याची जबाबदारी संचालक मंडळ व मुख्य कार्यकारी अधिकारी यांची राहील व अनुशेषाची सर्व पदे भरल्याखेरीज इतर कोणतीही नोकरभरती प्रक्रिया करु नये असेही बँकेस निर्देशीत केलेले आहे. ज्युनिअर ऑफीसरची ०६ पदे भरण्याकरीता दिनांक ०२/०६/२०१८ रोजी केलेली नोकरभरती प्रक्रिया त्वरीत थांबविण्यात यावी, असे बँकेस कळविण्यात आलेले आहे.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील सांताक्रुझ (पूर्व) येथे राहणाऱ्या श्री.तेजस दुबे या तरुणाचा सहाव्या मजल्यावरील घरांच्या खिडकीमधून पडून मृत्यू झाल्याबाबत

**(३०) ४४०९० (०५-१२-२०१८). डॉ.(श्रीमती) नीलम गोऱ्हे :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मुंबईतील सांताक्रुझ (पूर्व) येथे राहणाऱ्या श्री.तेजस दुबे या ३२ वर्षीय तरुणाचा एका मित्राच्या सहाव्या मजल्यावरील घरांच्या खिडकीमधून पडून मृत्यू झाल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उपरोक्त प्रकरणी स्थानिक पोलीस स्थानकांत गुन्हा दाखल करुन तपास करण्यात आला आहे काय, तपासात काय निष्पन्न झाले आहे व त्यानुसार शासनाने कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२८-१२-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे,
(२) सदर प्रकरणी वाकोला पोलीस ठाणे, मुंबई येथे अपमृत्यू प्रकरण नोंद क्र. ८८/२०१८ कलम १७४ फौजदारी प्रक्रिया संहिता अन्वये गुन्हा दाखल करण्यात आला असून, सदरचा मृत्यू हा अपघाती, दारुच्या नशेत पडून झाल्याचे निष्पन्न झाले आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## वीज निर्मिती प्रकल्पामध्ये कोळशाच्या अपूऱ्या साठ्यामुळे भारनियमन होत असल्याबाबत

**(४१) ४४४३४ (०५-१२-२०१८). श्री.रामदास आंबटकर, प्रा.अनिल सोले, श्री.नागोराव गाणार, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विलास पोतनीस, डॉ.(श्रीमती) मनिषा कायंदे : तारांकित प्रश्न क्रमांक ४१९४२ ला दिनांक १० जुलै, २०१८ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील महानिर्मितीच्या वीज निर्मिती प्रकल्पामध्ये कोळशाच्या अपूऱ्या साठ्यामुळे भारनियमनाची सावट निर्माण झाल्याचे दिनांक १९ सप्टेंबर, २०१८ रोजी वा त्यासुमारास निदर्शनास आले, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर भारनियमन रोखण्यासाठी वीज केंद्राला योग्य कोळशाचा पुरवठा होण्यासंबधी शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (२२-०१-२०१९) :** (१) औष्णिक विद्युत केंद्रांना नियमित कोळसा पुरवठ्यासाठी, महानिर्मितीने केंद्र शासनाच्या अखत्यारीतील कोल इंडिया लि. या कंपनीच्या उपकंपन्या WCL, MCL, SECL, आणि सिंगारेनी कोल कंपनी (SCCL) यांच्याशी दीर्घकालीन इंधन पुरवठा करार केलेले आहेत. कोळसा पुरवठा नियोजनासाठी महानिर्मितीकडून कोळसा कंपन्यांना प्रत्येक पुढील महिन्यासाठी आगाऊ कोळसा मागणी पत्र (Order booking programme) दिले जाते.

मासिक कोळसा मागणी पत्रानुसार (Monthly order booking programme) कोळसा कंपन्यांकडून पुरेसा कोळसा पुरवठा न झाल्यामुळे कोळसा साठा खालावत आहे. केंद्रीय विद्युत प्राधिकरण (CEA), नवी दिल्ली यांच्या निर्देशानुसार महानिर्मितीकडे २२ दिवस पुरेल इतका कोळसासाठा अपेक्षित आहे. परंतु महानिर्मितीकडे दिनांक १९/०९/२०१८ रोजी २९८६५० मे.टन (२.५ दिवस) पुरेल इतकाच कोळसा साठा उपलब्ध होता.

केंद्र शासनाच्या अखत्यारीतील कोळसा कंपन्या व रेल्वेज यांनी सकारात्मक दृष्टीकोन ठेवून कोळसा रेक्सची संख्या वाढवून दिल्यास कोळसा पुरवठ्यात आणखी सुधारणा होणे अपेक्षित आहे.

(२) महानिर्मिती कंपनीने कोळसा साठा वाढविण्यासाठी केलेल्या उपाययोजना :-

कोळशाचा अपुरा साठा आणि पुरवठा याबाबत कोल इंडिया लि. कोळसा कंपन्या व केंद्रीय विद्युत प्राधिकरण (CEA) सोबत महानिर्मिती कंपनीने सातत्याने पत्रव्यवहार व पाठपुरावा करीत आहे.

कोळसा कंपन्यांकडून होणारा अपुरा कोळसा पुरवठा व कोळसा साठ्यात वेगाने होणारी घट यामुळे महानिर्मितीने सन २०१८-१९ मध्ये कॉस्ट प्लसच्या दराने डब्ल्यू.सी.एल. च्या खाणीतून १५ लक्ष मे.टन व एस.सी.सी.एल. च्या खाणीतून १५ लक्ष मे.टन कोळसा घेण्यासाठी सामंजस्य करार केले आहेत.

केंद्रीय विद्युत प्राधिकरण (CEA) यांनी कोळसा पुरवठ्यात वाढ होण्यासाठी, विद्युत केंद्रापासून ६० कि.मी. अंतरांच्या आतील असलेल्या कोळसाखाणीमधून कोळशाची रस्त्याने वाहतूक करुन कोळसा पुरवठा करण्याची अनुमती दिली. महानिर्मितीने आजतागायत डब्ल्यू.सी.एल. च्या

कोळसा खाणींमधून दररोज अंदाजे २३२९३ मे.टन एवढा कोळसा रस्ता वाहतुकीने आणण्यासाठी कंत्राटे दिली आहेत व त्यानुसार कोळसा वाहतून करुन औष्णिक विद्युत केंद्रांना कोळसा पुरवठा करण्याचे काम सुरु केले आहे.

दिनांक ०७ ऑक्टोबर, २०१७ रोजी मा.मुख्यमंत्री महाराष्ट्र शासन यांच्या अधिपत्याखाली केंद्रीय विद्युत प्राधिकरण (CEA), कोल इंडिया लि. डब्ल्यू.सी.एल. व रेल्वे प्रतिनिधी यांचे सोबत आढावा बैठक घेतली. तसेच ऑक्टोबर, २०१८ आणि नोव्हेंबर, २०१८ मध्ये डब्ल्यू.सी.एल. च्या अधिकाऱ्यांसोबत विविध बैठका घेतल्या सदर बैठकीनंतर महानिर्मितीस कोळसा कंपन्यांकडून सरासरी २४-२५ रेक्स प्राप्त होत आहेत.
(३) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## मुंबईतील अंधेरी येथील सी.डी.बर्फीवाला शाळेचे उपमुख्याध्यापक यांनी शाळेच्या इमारतीवरून उडी मारून आत्महत्या केल्याबाबत

**(४२) ४४६७९ (०५-१२-२०१८). श्री.नागोराव गाणार, प्रा.अनिल सोले, श्री.गिरीशचंद्र व्यास, श्री.विजय ऊर्फ भाई गिरकर, श्री.रामदास आंबटकर :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) मुंबई, अंधेरी येथील सी.डी.बर्फीवाला शाळेचे उपमुख्याध्यापक यांनी शाळेच्या इमारतीवरून उडी मारून आत्महत्या केल्याचे माहे ऑगस्ट, २०१८ च्या तिसऱ्या आठवड्यात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, विद्यार्थीप्रिय शिक्षक म्हणून गत २० वर्षे त्यांची ओळख असतानाही आत्महत्या करण्याची कारणे काय आहेत, याबाबत शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२९-१२-२०१८) :** (१) होय, हे खरे आहे. दिनांक १०/०८/२०१८ रोजी मुंबई अंधेरी येथील सी.डी. बर्फीवाला शाळेचे शिक्षक यांनी शाळेच्या इमारतीवरून उडी मारून आत्महत्या केली आहे.

(२) सदर प्रकरणी मयताच्या पत्नीने दिलेल्या जबाबावरुन मयत यास मागील १५ वर्षापासनू उच्च रक्तदाब व मधुमेह या आजाराने त्रस्त होते. तसेच त्यांचेवर २५ लाखाचे कर्ज होते. त्यामुळे त्यांनी मानसिक तणावाखाली आत्महत्या केली असून, सदर प्रकरणी त्यांचा कोणावरही संशय किंवा तक्रार नसल्याचे सांगितले आहे. तसेच वैद्यकिय अधिकारी यांनी दिलेल्या अहवालानुसार मयताचे मृत्यूचे कारण SHOCK DUE TO CRANIOCEREBRAL INJURY (UNNATURAL) असे आहे. सदर प्रकरणी दा.नौ.नगर पोलीस ठाणे, मुंबई येथे तात्काळ अपमृत्यू नोंद क्र.६१/२०१८ कलम १७४ सीआरपीसी अन्वये नोंद घेण्यात आली आहे.
(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर शहरातील झोपडपट्टीवासीयांना मालकीपट्टे मिळण्यास अडथळा निर्माण झाल्याबाबत

**(४३) ४५३५५ (३०-१०-२०१८). श्री.प्रकाश गजभिये :** सन्माननीय **गृहनिर्माण मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) नागपूर शहरातील नझुलच्या जमिनीवरील झोपडपट्टयांची जमीन "झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण" (एसआरए) कडे हस्तांतरित करण्याचे परिपत्रक दिनांक २६ डिसेंबर, २०१७ रोजी काढण्यात आले असल्यामुळे उक्त जमिनीवरील झोपडपट्टीवासीयांना मालकीपट्टे मिळण्यात अडथळा निर्माण झाले असून त्यांच्यात प्रचंड असंतोष निर्माण झाल्याचे निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, सदर परिपत्रकामुळे नझुलच्या गौतमनगर, राहूलनगर, सरस्वतीनगर व अंगुलीमाल कॉलनी या चार झोपडपट्टयांमधील मालकीपट्टे देण्याच्या सुरु झालेल्या प्रक्रियेवर संकट ओढवले आहे तसेच झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरणाला मालकीपट्टे वितरणाचा अधिकार नसून फक्त पुनर्वसन करण्याचा अधिकार आहे, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.प्रकाश महेता (२०-११-२०१८) :** (१) जिल्हाधिकारी, नागपूर यांनी दिनांक २६/१२/२०१७ व दिनांक १४/०६/२०१८ अन्वये नागपूर शहरातील नझूलच्या जागेवर वसलेल्या अंगुलीमाल कॉलनी, गौतम नगर, राहूल नगर व सरस्वती नगर इत्यादी जमिनी झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, नागपूर यांचेकडे हस्तांतरीत करण्याचे आदेश दिले आहेत. तथापि, अद्याप जमिनीचा ताबा प्राधिकरणास देण्यात आला नाही. सदर झोपडपट्टयांबाबत सध्या कुठलीही पुनर्वसन योजना प्रस्तावित नसल्याने व तेथील नागरीकांची मालकीने पट्टयांची मागणी असल्याने या जमिनीबाबतच्या पट्टे वाटपाची कार्यवाही जिल्हाधिकारी कार्यालयाकडूनच करण्याबाबत प्राधिकरणाने जिल्हाधिकारी, नागपूर यांना दिनांक १७/११/२०१८ अन्वये विनंती केली आहे.
(२) व (३) झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, नागपूर यांचेमार्फत नागपूर शहरातील घोषित झोपडपट्टीमध्ये पुनर्वसन योजना राबविली जाते. नागपूर शहरातील झोपडपट्टीमध्ये पट्टे वाटपाची कार्यवाही प्राधिकरणामार्फत करण्यात येत नाही.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## विलेपार्ले, मुंबई येथील दिक्षित रोड वर जिऊतिया (जीविपुत्रिका) पुजा करित असताना विहिरीत पडून मृत्यू झाल्याबाबत

**(४४) ४६०११ (०५-१२-२०१८). श्री.रामनिवास सिंह :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) विलेपार्ले, मुंबई येथील दिक्षित रोड वर जिऊतिया (जीविपुत्रिका) पुजा करित असलेल्या दोन महिला व एक लहान मुलगा विहिरीत पडून मृत्यू झाल्याची घटना माहे ऑक्टोबर, २०१८ मध्ये वा त्यादरम्यान घडली आहे, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, सदर घटनेची शासनाने चौकशी केली आहे काय, त्यात काय आढळून आले व तद्नुसार शासनस्तरावर काय कार्यवाही केली वा करण्यात येत आहे,

(३) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२८-१२-२०१८) :** (१) हे खरे आहे.

सदर दुर्घटना दिनांक ०२/१०/२०१८ रोजी घडली असून यामध्ये एक महिला व दोन मुली यांचा मृत्यू झाला आहे.

(२) दिनांक ०२/१०/२०१८ रोजी सायंकाळी १६.०० चे सुमारास विलेपार्ले येथील रुईया बंगला परिसरातील विहिरीवर पारंपारिक पध्दतीने जुतीया माँ या देवीची पुजा करण्यासाठी लहान मुलांसह महिला जमल्या होत्या. त्यातील १२ ते १५ महिला व मुले विहिरीवर असलेल्या स्लॅबवर पुजेसाठी थांबलेले असताना त्यांच्या वजनामुळे सदर महिला स्लॅबसह विहिरीत कोसळल्या.

त्यावेळी तेथे हजर असलेल्या स्थानिक लोकांनी काही महिलांना बाहेर काढले व अग्निशमन दलाची वाहने आल्यानंतर पंपाद्वारे विहिरीतील पाणी उपसून काढले तेव्हा त्यामध्ये एक महिला व दोन मुली बेशुध्द अवस्थेत मिळून आल्याने त्यांना तात्काळ कूपर रुग्णालयात दाखल करण्यात आले. तेथे डॉक्टरांनी त्यांना दाखलपुर्व मयत घोषित केले.

सदरची घटना ही नैसर्गिक अपघाताने झालेली असून त्यामध्ये कोणाचाही हलगर्जीपणा किंवा निष्काळजीपणा झालेला नसल्याने त्याबाबत दखलपात्र गुन्हा नोंद करण्यात आलेला नाही. सदर घटनेबाबत विलेपार्ले पोलीस स्टेशन येथे अपमृत्यू नोंद क्रमांक ५९/१८, ६०/१८ व ६१/१८ कलम १७४ अन्वये नोंद करुन पुढील चौकशी चालू आहे.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

## राज्यातील मराठी माध्यमाच्या खाजगी विनाअनुदानित व अनुदानित सर्व शाळांना निवासी दराने वीज पुरवठा करण्याबाबत

**(४५) ४९०६३ (२०-०६-२०१४). श्री.सतिश चव्हाण, श्री.धनंजय मुंडे, श्री.विक्रम काळे, श्री.अब्दुल्लाखान दुर्राणी, डॉ.सुधीर तांबे : तारांकित प्रश्न क्रमांक ४५५१८ ला दिनांक २० डिसेंबर, २०१३ रोजी दिलेल्या उत्तराच्या संदर्भात :** सन्माननीय **वित्त मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) राज्यातील मराठी माध्यमाच्या सर्व शाळांना निवासी दराने वीज पुरवठा करण्यासाठी शासन विचाराधीन आहे काय,

(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने कोणता निर्णय घेतला वा घेण्यात आलेला आहे,

(३) तसेच उपरोक्त निर्णयाचे स्वरुप काय आहे,

(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.सुधीर मुनगंटीवार (२२-०१-२०१९) :** (१), (२) व (३) वीज दर ठरविण्याचा अधिकार महाराष्ट्र राज्य विद्युत नियामक आयोगाच्या अखत्यारित येतो व त्यानुसार राज्यातील मराठी माध्यमाच्या सर्व शाळांना “सार्वजनिक सेवा” या वर्गवारीनुसार वीज बिलाची आकारणी करण्यात येते.

(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## मौजे पाडळी (ता.जुन्नर, जि.पुणे) येथील जागेवर बेघरांसाठी वसाहत स्थापन करण्याबाबत

**(४६) ४९९९६ (०३-०७-२०१४). श्री.हेमंत टकले, श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **मुख्यमंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) मौजे पाडळी (ता.जुन्नर, जि.पुणे) येथील गट क्र. ११ क्षेत्र ५ हेक्टर ७५ आर ही जागा बेघरांच्यासाठी आरक्षित करुनही त्या जागेवर शासनामार्फत वसाहत स्थापन केलेली नाही, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, त्याची कारणे काय आहेत,

(३) तसेच बेघरांचा प्रश्न कायमस्वरुपी सोडविणेबाबत शासनाने कोणती उपाययोजना केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.देवेंद्र फडणवीस (२०-११-२०१८) :** (१) व (२) हे खरे नाही.

सदर जमिनीचा ताबा जिल्हाधिकारी, पुणे यांनी दिनांक २९/०८/२००२ रोजी पुणे गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळाला दिला. मूळ योजना ही जुन्नर नगरपरिषदेमार्फ राबविण्यात येणार होती. तथापि, नगरपरिषदेची आर्थिक कुवत नसल्याने सदर जमीन म्हाडाकडे हस्तांतरीत करण्यात आली. या योजनेबाबत दिनांक १६/०६/२०१४ रोजी अधिकारी व स्थानिक बेघर रहिवाशी संस्था यांच्यात झालेल्या बैठकीमध्ये सदर जमीन जुन्नर नगरपरिषदेच्या ताब्यात आल्यानंतर नियोजन करुन भूखंड वाटप करण्याचे अथवा नगरपरिषदेकडे उपलब्ध असलेल्या योजनेनुसार कार्यवाही करण्याचे ठरले. सदर जमीन शासनास परत करण्यासाठी मुख्याधिकारी, पुणे गृहनिर्माण व क्षेत्रविकास मंडळ यांनी तसा प्रस्ताव दिनांक ११/०६/२०१४ रोजी जिल्हाधिकारी, पुणे यांच्याकडे सादर केला.
(३) प्रधानमंत्री आवास योजना राबविण्यासाठी जुन्नर नगरपरिषदेने शन्य कंन्सल्टंन्ट यांची नेमणूक करुन त्याप्रमाणे घटक क्र. १, ३ व ४ चे सर्व्हेक्षण करुन घटक क्र. १ चा २४० घरांचा प्रस्ताव दिनांक ५/०७/२०१८ तसेच घटक क्र. ३ करीता ८१ घरांचा प्रस्ताव दिनांक १२/१०/२०१८ रोजी म्हाडाकडे सादर केला आहे. तसेच घटक क्र. ४ चे सर्वेक्षण पूर्ण झाले असून त्यानुसार सविस्तर प्रकल्प अहवाल सादर करण्यात येईल, असे मुख्याधिकारी, जुन्नर नगरपरिषद यांनी कळविले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## नागपूर जिल्हा मध्यवर्ती को-ऑप.बँकेच्या आर्थिक गैरव्यवहारातील रक्कमेची वसुली करण्याबाबत

**(४७) ५०११९ (०१-०७-२०१४). श्री.नागोराव गाणार** : सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) नागपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेत सन २००२ मध्ये झालेल्या आर्थिक गैरव्यवहाराची चौकशी विशेष अंकेक्षक श्री यशवंत बागडे यांनी केली, हे खरे आहे काय,

(२) असल्यास, श्री.बागडे यांनी केलेल्या चौकशीत १२४.६० कोटी रुपयांचा गैरव्यवहार झाल्याचे निदर्शनास आले, हे ही खरे आहे काय,

(३) असल्यास, गैरव्यवहारची रक्कम १२ टक्के दराने तत्कालीन अध्यक्ष श्री.सुनिल केदार व श्री.अशोक चौधरी यांचेकडून वसूल करावी असे आदेश श्री.बागडे यांनी दिले होते, हे ही खरे आहे काय,

(४) असल्यास, या आदेशविरुध्द तत्कालीन अध्यक्ष श्री.सुनिल केदार यांनी सहकार मंत्र्यांकडे अपिल दाखल केले आहे, हे ही खरे आहे काय,

(५) असल्यास, ह्या अपिलावर कोणतीही कार्यवाही न करता प्रलंबित ठेवण्यात आले, हे ही खरे आहे काय,

(६) असल्यास, अपिल इतका प्रदीर्घ काळ प्रलंबित ठेवण्याची कारणे कोणती आहेत,

(७) असल्यास, हे अपिल केव्हापर्यंत निकाली काढण्यात येणार आहे ?

**श्री.सुभाष देशमुख (२८-०१-२०१९) :** (१) होय, हे खरे आहे.

(२) श्री.बागडे यांनी केलेल्या चौकशीत श्री.सुनिल केदार, माजी. अध्यक्ष यांचेवर रुपये १,२६,७७,७८,०००/- श्री.अशोक चौधरी, माजी सरव्यवस्थापक यांचेवर रुपये २५,४०,५२,०००/- सौ.आशाताई महाजन माजी उपाध्यक्ष, श्री.शामराव धवड, सौ.कुसूमताई किंमतकर, श्री.मोरबाजी निमजे, श्री.रमेश निमजे आणि श्री.संतोष चोरे सर्व माजी संचालक यांचेवर अनुक्रमे रुपये १०००/- मूळ दायित्व निश्चित केलेले आहे.

(३) होय.

श्री.बागडे, चौकशी अधिकारी यांनी दिनांक २८/११/२०१३ रोजी दिलेल्या अंतिम आदेशानुसार उपरोक्त रक्कम ह्या आदेशाच्या तारखेपासून एक महिन्याच्या आत, त्यावरील दिनांक १३/०५/२००२ या तारखेपासून रक्कम प्रत्यक्षात बँकेत भरणा करण्याच्या तारखेपर्यंत द.सा.द.शे. १२ % व्याजासह बँकेत नगदीने किंवा क्रॉस्ड डिमांड ड्राफ्टद्वारे जमा करावी असे निर्देश दिले आहेत.

(४) होय.

श्री.सुनिल केदार यांनी शासनाकडे या आदेशाविरुध्द अपील क्रमांक ८९१/२०१३ दाखल केले होते.

(५) नाही.

सद्य:स्थितीत सदर अपील क्रमांक ८९१/२०१३ प्रलंबित नसून शासनाच्या दिनांक १४/०६/२०१४ च्या आदेशानुसार सदरील अपील अंशत: मान्य करण्यात आले आहे. तसेच प्रतिवादी क्र. २ प्राधिकृत अधिकारी कलम ८८, नागपूर जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँक मर्यादित नागपूर यांचे दिनांक २८/११/२०१३ रोजीच्या आदेश पत्रातील मुद्या क्र. १, २, ५, ६ व ७ पूर्णपणे रद्द करण्यात आलेले आहे. प्रस्तुत प्रकरणी कलम ८८ नुसार फेर चौकशी करण्यासाठी प्राधिकृत अधिकाऱ्यांची नेमणूक करावी असे विभागीय सहनिबंधक सहकारी संस्था, नागपूर यांना निर्देश देण्यात आलेले आहेत. नवनियुक्त प्राधिकृत अधिकाऱ्यांनी दोष पत्रातील मुद्या क्र. १, २, ५, ६ व ७ च्या अनुषंगाने चौकशी करण्याबाबत त्यांना निर्देश देण्यात आले आहेत. खर्चाबाबत काहीही आदेश नाहीत.

(६) श्री.सुनिल केदार यांनी प्राधिकृत अधिकारी यांचा अंतिम आदेश दिनांक १८/११/२०१३ च्या विरोधात शासनाकडे अपील दाखल केल्यानंतर प्रस्तुत अपील अर्जाची सुनावणी दिनांक ०६/१२/२०१३, दिनांक २३/१२/२०१३, दिनांक १५/०१/२०१४, दिनांक २९/०१/२०१४, आणि दिनांक ११/०२/२०१४ रोजी घेण्यात आली त्यानंतर लोकसभेच्या सार्वत्रिक निवडणूक आचारसंहितेमुळे अपीलाची सुनावणी झाली नाही. शासनाने दिनांक १४/०६/२०१४ रोजी आदेश पारी करुन अपील निकाली काढले आहे.

(७) शासनाने दिनांक १४/०६/२०१४ रोजी अपील निकाली काढले आहे.

---

## वैभववाडी (जि.सिंधुदुर्ग) तालुक्यात वीज मीटर रीडींगचे मनमानी काम करणाऱ्या एजन्सीवर कारवाई करण्याबाबत

**(४८) ५०५५६ (२३-०६-२०१४). श्री.अशोक ऊर्फ भाई जगताप :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) वैभववाडी (जि.सिंधुदुर्ग) तालुक्यात वीज मीटर रीडींगचे काम करणाऱ्या एजन्सीच्या मनमानी कारभारामुळे ग्राहकांना वीज देयकाचा आर्थिक भुर्दंड सोसावा लागत असल्याने त्यांच्यात तीव्र असंतोष पसरला असल्याचे माहे मार्च, २०१४ मध्ये वा त्यादरम्यान निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, या प्रकरणी चौकशी करण्यात आली आहे काय,
(३) असल्यास, चौकशीत काय आढळून आले व त्यानुसार दोषी आढळून येणाऱ्या एजन्सीवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (२२-०१-२०१९) :** (१) होय, एकूण २१ वीज ग्राहकांना चुकीची वीज बिले आकारणे झाल्याचे निदर्शनास आले आहे.
(२) होय.
(३) संबंधित कंत्राटदारांकडून २१ वीज ग्राहकांचे मीटर वाचनाची नोंद चुकीची करण्यात आली असल्यामुळे, संबंधित ग्राहकांना चुकीच्या आकाराची वीज देयके देण्यात आली होती. सदरील वीज ग्राहकांच्या मीटर वाचनाची चुकीची नोंद करणाऱ्या संबंधित दोषी कंत्राटदाराकडून देण्यात आलेल्या कामाच्या अटी व शर्तीनुसार, दंडात्मक कार्यवाही करुन रुपये २,१००/- दंड वसूल करण्यात आले आहेत. तसेच सदर वरील झालेल्या प्रकाराची पुनरावृत्ती होऊ नये म्हणून संबंधित कंत्राटदारांस समज सुध्दा देण्यात आली आहे. तसेच संबंधित वीज ग्राहकांच्या वीज बिलांच्या तक्रारीचे निरसन करुन चुकीच्या आकारणीची वीज बिले दुरुस्ती करुन सुधारीत वीज देयके देण्यात आली आहेत. त्यामुळे वीज ग्राहकावर आर्थिक बोजा पडलेला नाही.
(४) प्रश्न उद्‌भवत नाही.

---

## येरवडा (पुणे) परिसरातील वीज देयकाची थकबाकी असणाऱ्यांना नवीन मीटर दिल्याबाबत

**(४९) ५१३५९ (२०-०६-२०१४). श्री.अनिल भोसले :** सन्माननीय **ऊर्जा मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-

(१) पुण्यातील येरवडा परिसरात वीज ग्राहकांकडे वीज बिलाची मोठी रक्कम थकीत असताना नवीन मीटर घेऊन थकबाकी बुडविण्यात येत असल्याचे माहे एप्रिल, २०१४ च्या तिसऱ्या सप्ताहात निदर्शनास आले आहे, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, उक्त प्रकरणी शासनाने चौकशी केली आहे काय,
(३) असल्यास, चौकशीचे निष्कर्ष काय आहेत व तदनुसार थकबाकी असताना नवीन मीटर देण्यास जबाबदार असणारे महावितरणाचे अधिकारी/ कर्मचारी यांचेवर कोणती कारवाई केली वा करण्यात येत आहे,
(४) नसल्यास, विलंबाची कारणे काय आहेत ?

**श्री.चंद्रशेखर बावनकुळे (२२-०१-२०१९) :** (१) होय.
(२) होय.
(३) सदर चौकशीत नविन वीज जोडणीकरीता प्राप्त झालेल्या चार अर्जावर संबंधितांकडे थकबाकी असून सुध्दा त्यांचेकडे “थकबाकी नाही” असे लिहिल्याचे आढळून आले. यास जबाबदार असणाऱ्या कनिष्ठ तंत्रज्ञास निलंबित करण्यात आलेले असून त्यांचेविरुध्द विभागीय चौकशीची कार्यवाही सुरु करण्यात येऊन आरोपपत्र बजावण्यात आले आहे.
(४) प्रश्न उद्भवत नाही.

---

## उस्मानाबाद जिल्हा बँकेला आर्थिक सहाय्य करणेबाबत

**(५०) ५१७७९ (०३-०७-२०१४). श्री.विक्रम काळे :** सन्माननीय **सहकार मंत्री** पुढील गोष्टींचा खुलासा करतील काय :-
(१) राज्यातील नागपूर, बुलढाणा आणि वर्धा येथील आर्थिक अडचणीत सापडलेल्या जिल्हा बँकांना शासनाने आर्थिक मदत केली तथापि, उस्मानाबाद जिल्हा बँकेला आर्थिक सहाय्य करण्यात आले नाही, हे खरे आहे काय,
(२) असल्यास, त्याची कारणे काय आहेत,
(३) तसेच सद्य:स्थितीत अडचणीत सापडलेल्या उस्मानाबाद जिल्हा बँकेला आर्थिक सहाय्य करणेबाबत शासनाने कोणती कार्यवाही केली वा करण्यात येत आहे ?

**श्री.सुभाष देशमुख (२८-०१-२०१९) :** (१) होय. नागपूर, बुलढाणा आणि वर्धा बँकेस बँकींग परवाना मिळण्यासाठी अर्थसहाय्य करण्याबाबतचा निर्णय घेण्यात आला आहे. तथापि, उस्मानाबाद जिल्हा सहकारी बँकेस आधीच परवाना मिळाल्यामुळे आर्थिक सहाय्य करण्यात आले नाही.

(२) प्रश्न उद्भवत नाही.

(३) प्रश्न उद्भवत नाही.

---

**विधान भवन :**
**मुंबई.**

**जितेंद्र भोळे**
**सचिव (कार्यभार),**
**महाराष्ट्र विधानपरिषद.**

---

मुद्रणपूर्व सर्व प्रक्रिया महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या संगणक यंत्रणेवर करण्यात आली आहे.
मुद्रण: शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.